बद्दल शंका उत्पन्न होते. जपानी लोकांतच ते सद्गुण असून दुसऱ्या राष्ट्रांतील लोकांमध्यें त्यांतील बहुतेक गुण आढळून येत नाहींत अशी जर वस्तुस्थिति असती तर वरील नांव योग्य आहे असें समर्थन करितां आलें असतें; परंतु तशी गोष्ट नाहीं. ज्यां पुरुषाचे मनांत ' ट्रॅन्सव्हालची मर्दुमकी ' अथवा ' इटलीची मर्दुमकी ' वर्णावयाची इच्छा उत्पन्न झाली तर ' जपानची मर्दुमकी ' या पुस्तकांतील गुणांचेंच वर्णन करून स्पष्टीकरणार्थ त्या त्या देशांतील कांहीं विशिष्ट उदाहरणें दिलीं म्हणजे काम होईल. तात्पर्य, इतर राष्ट्रांत जे गुण आहेत तेच गुण पुनरुज्जीवन झालेल्या जपानांतही आहेत हें सांगण्यास रा. देवांच्या मर्दुमकीची जरूरी नव्हती. रा. देव जपानचा इतिहास लिहीत आहेतच. तेव्हां त्यांतच वरील पुस्तकांत दाखविलेल्या गुणांची ठळक रीतीनें मांडणी केली असती व परकीयांस जपानच्या ज्या चालीरितींचा चमत्कार वाटतो त्यांचाही उल्लेख केला असता तर एकाच पुस्तकांत रा. देवासारख्या विद्वान् गृहस्थांनीं रेखाटलेलें जपानचें सुंदर चित्र पाहून वाचकवर्ग फार संतुष्ट झाला असता. असो.

रा. देवांच्या पुस्तकांत आणखी एक दोन दोष आहेत. जपानी लोकांची स्तुति करण्याच्या भरांत त्यांच्या कांहीं दुर्गुणांवरदेखील सद्गुणांचें पांघरूण घालण्याचा प्रयत्न त्यांनीं केलेला आहे. आत्महत्या ( हाराकिरी ) करणें हें महत्पाप नसून अथवा भित्रेपणाचें लक्षण नसून अब्रूसंरक्षणाचें एक साधन आहे असें त्या चालीचें समर्थन केलेलें आहे. त्याचप्रमाणें अविचारानें कोणतेंही साहस करण्यास धजणाऱ्या अडदांड रोनिन लोकांस देशभक्त या पदवीस नेऊन पोहोचविलें आहे. कित्येक ठिकाणीं कांहीं विशेष गोष्टीवरून सामान्य सिद्धांत स्थापन केलेले आहेत व एकंदरींत जपानी लोक म्हणजे या भूतलावर राहणारे देवच आहेत असें भासविण्याचा प्रयत्न केलेला आहे असें पदोपदीं दिसून येतें. परंतु ' मर्दुमकी ' पुस्तक वाचल्यावर व जपानचा इतिहास वाचण्याचे-पूर्वी जपानाविषयीं वाचकांच्या मनांत ज्या अनेक कल्पना उभ्या

राहतात त्या सर्व इतिहासाचें अवलोकन केल्यावर खोट्या ठरतात व ते लोक देव नसून मृत्यु लोकाच्याच एका भागामध्यें वास करीत असून मानवी प्राण्यांमध्यें इतरत्र जे दोष आढळून येतात तेच दोष त्यांच्यामध्येंहि दृष्टोत्पत्तीस आल्याशिवाय रहात नाहींत. असो. 'जपानची मर्दुमकी' हें नांव नुसतें ऐकल्यावर वाचकाचें जें अनुमान होतें तें जरी सर्वथा खोटें ठरतें तरी जसें जसें तें पुस्तक वाचीत जावें तशी तशी त्याची जपानच्या इतिहासाचें ज्ञान मिळविण्याची इच्छा बळावत जाते. प्रस्तुत लेख याच इच्छेचें फल होय; व अशी सुसंधि रा. देव यांनीं मला आणून दिली याबद्दल त्यांचे आभार मानून वर निर्दिष्ट केलेल्या विषयास आरंभ करितों.

जपानच्या इतिहासास आरंभ करण्यापूर्वी थोडेंसें देशवर्णन देणें इष्ट आहे. प्राचीन कालीं जपान देश 'चिपेंकु' या नांवानें चिनी लोकांस माहीत होता. याच नांवाचा अपभ्रंश करून जपानी लोक त्याला 'निपोन' (पूर्व प्रदेश) असें ह्मणूं लागले. मार्कोपोलो नांवाचा व्हेनीसचा प्रवाशी १३ व्या शतकाच्या अखेरीस चीन देशांतून प्रवास करून आल्यानंतर चीनच्या पूर्वेस कांहीं बेटें आहेत असें यूरोपमधील लोकांस कळलें व चीनी नांवाचा अपभ्रंश करून ते त्या बेटांस 'सिपँगो' असें ह्मणूं लागले व ह्याच नांवाचें पुढें 'जपान' असें अपभ्रष्ट रूप त्यांनीं प्रचारांत आणिलें व ह्याच नांवानें सध्यां हीं बेटें जगांतील सर्व लोकांस माहीत आहेत.

जपानचें राज्य चार मोठीं बेटें व सुमारें सव्वातीन हजार लहान बेटें मिळून झालेलें आहे. ह्या लहान बेटांच्या ठिकाणीं पाहिल्यानें मोठालीं बेटें असून ज्वालामुखी पर्वतांच्यायोगानें अथवा धरणीकंपामुळें त्यांचे शतशः लहान लहान तुकडे झाले असावेत व याच कारणांनीं बरींच नवीन लहान लहान बेटें उत्पन्न झालीं असावींत असें मोठमोठ्या शास्त्रज्ञांचें मत आहे. ह्या बेटांच्या समुदायामध्यें सर्वांत मोठें जें बेट आहे त्यास जपानी लोक होंडो (विशाल द्वीप) असें ह्मणतात. ह्या बेटाच्या खालोखाल येझो हें बेट होंडोच्या उत्तरेस आहे. तिसरें बेट

क्यूशु हें विशाल द्वीपाच्या दक्षिणेस आहे; व चार मुख्य बेटांपैकीं सर्वांत लहान बेट शिकोकु हें क्यूशूच्या पूर्वेस आहे. येझो बेट विस्तारामध्यें जरी होंडोच्या खालोखाल आहे तरी त्यांत सर्वांत कमी लोकसंख्या आहे. याच बेटाच्या आग्नेय दिशेस 'कुराइल' (जपानी नांव चिशिमा) नांवाचीं बेटें आहेत. तीं रशियाकडून जपानास १८७५ सालीं साघालिन बेटांतील कांहीं भागाबद्दल मोबदला ह्मणून मिळालीं; व १८९५ सालीं चीन देशाशीं युद्ध झाल्यावर फार्मोसा व पास्काडोर हीं बेटें जपानास मिळालीं. बाकीच्या लहान बेटांची हकीकत देण्याची जरूरी नाहीं. यावरून असें दिसून येईल कीं, जपानच्या राज्यांतील बेटें आशिया खंडांच्या बहुतेक सर्व पूर्वकिनाऱ्यासमोर असून त्याच्याशीं समांतरही आहेत. जपानचें क्षेत्रफळ सुमारें एक लक्ष एकसष्ट हजार चौरस मैल असून त्याची लोकसंख्या जवळ जवळ साडेचार कोटी आहे.

जपानमध्यें फुजीसान नांवाचा एकच मोठा पर्वत असून त्याची उंची १२५०० फूट आहे. डोंगरांच्या लहान लहान ओळी तर पुष्कळच आहेत. ह्यांत अनेक ज्वालामुखी पर्वत असून सुमारें अठरांतून धूर निघत असतो. ह्या डोंगरामध्यें समुद्रसपाटीपेक्षां बरींच उंच अशीं सरोवरेंही आहेत. ह्या सरोवरांमध्यें बिवा (ह्मणजे वीणा) ह्या नांवाचें सरोवर सर्वांत मोठें आहे. ह्याला बिवा ह्मणण्याचें कारण ह्याची आकृती वीण्याप्रमाणें आहे. जपानांतील बेटें अरुंद असल्यामुळें लांब नद्या तेथें नाहींत. टोने नदी सर्वांत लांब ह्मणजे सुमारें १७० मैल आहे. तरी हिच्या मुखापासून बरेच मैलपर्यंत नावा चालतात. लहान मोठ्या नद्यांतून कालवे काढलेले आहेत व ह्यांच्यायोगानें जमीन फार सुपीक झाली आहे. जपानांतील बेटें समशीतोष्ण व शीत कटिबंधांत पसरलेलीं असल्यामुळें त्या त्या कटिबंधांत इतरत्र उत्पन्न होणारे पदार्थ जपानांत उत्पन्न होतात. मेक्सिको आखातांत उगम पावलेला उष्ण पाण्याचा प्रवाह इंग्लंडकडे वहात आल्यामुळें त्या देशांतील हवेवर जे परिणाम

घडलेले आहेत तेच परिणाम ' नील प्रवाह ' नामक उष्ण प्रवाहाच्या-योगानें जपानमध्यें घडत आहेत. हा प्रवाह उष्ण कटिबंधांत फिलि-पाइन बेटांजवळ उत्पन्न होऊन उत्तरेकडे वहात जाऊन क्यूशु बेटाच्या दक्षिण किनाऱ्यावर आपटतो; यामुळें याचे लहान मोठे दोन विभाग होऊन मोठा प्रवाह जपानच्या पूर्वकिनाऱ्याजवळून जातो व धाकटा प्रवाह पश्चिम-किनाऱ्याजवळून वहात जाऊन उत्तरेकडे पॅसिफिक महासागरास जाऊन मिळतो. याप्रमाणें जपानच्या दोनही बाजूंनीं उष्ण पाण्याचे प्रवाह वहात असल्यामुळें थंडीचा कडकपणा बराच कमी होऊन बर्फामुळें झाडांचा नाश न होतां हवेमध्यें फक्त ओलावा राहून झाडें नेहमीं टवटवीत व रमणीय दिसतात. एकंदरींत पाहिलें असतां जपानची हवा मनुष्यांस निःसत्व, निरुत्साही व आळशी करणारी नसून त्यांची शक्ति कायम राखणारी, त्यांस हुरूप आणणारी, उद्योगी मनुष्यास उत्साह देणारी, निरुद्योगी मनुष्यांस कामास प्रवृत्त करणारी व आल्हाद-कारक अशी आहे. उंच पर्वत, सतत वाहणाऱ्या नद्या, विस्तीर्ण सरोवरें, सुपीक जमीन आणि सतत हिरवींगार दिसणारीं झाडें, ह्या सर्वांमुळें प्रदेशास एक प्रकारची अवर्णनीय रमणीयता प्राप्त झालेली आहे. देशां-तील व्यापारधंदेहि फार वाढलेले असल्यामुळें लोकही सुसंपन्न, सुखी व सदाचारी आहेत. अशा देशांत स्वराज्यच्छत्राखालीं राहण्याचें ज्या लोकांच्या नशीबीं आहे ते लोक धन्य व पुण्यवान् आहेत यांत शंका नाहीं. डॉन रॉड्रिगो नांवाचा एक स्पॅनिश मनुष्य १६०८ मध्यें जपानमध्यें प्रवास करीत असतांना तो देश पाहून तो इतका खुष झाला कीं, ' धर्मनिष्ठा व राजनिष्ठा यांचा त्याग करण्यास जर मी प्रवृत्त झालों असतों तर स्वदेशांत राहण्यापेक्षां जपानांत राहणेंच मला बरें वाटलें असतें ' अशा प्रकारचे उद्गार त्याच्या तोंडांतून निघाले. तेव्हां जर ही स्थिति, तर आज ३०० वर्षांनीं जपान केवळ इंद्रभुवन बनलें असल्यास नवल नाहीं.

जपानी लोकांविषयीं कांहीं माहिती सांगितल्यावांचून वरील वर्णनास पूर्णता येत नाहीं, ह्मणून ती थोडक्यांत खालीं दिली आहे. जपानांत

मध्यां दोन जातीचे लोक आहेत. १ले, ऐनो व २रे, जपानी. यांपैकीं ऐनो लोक जपानांतील मूळचे रहिवाशी होत. जपानी लोकांनीं जेव्हां दक्षिणेकडून स्वाऱ्या करून वसाहती केल्या त्यावेळीं त्यांनीं ऐनो लोकांस उत्तरेकडे हाकून लाविलें. हल्लीं हे लोक येझो आणि चिशिमा ( कुराइल ) बेटांत मात्र सांपडतात. त्यांची लोकसंख्या जपानच्या राज्यांत वीस हजारांपेक्षां जास्त नाहीं. जपानी लोक प्रथम आले त्यावेळीं हे लोक त्यांच्याशीं फार धीरानें व शौर्यानें लढले. परंतु त्यांस फारच क्रूरपणानें वागविल्यामुळें व पिढ्यानुपिढ्या त्यांचेवर फार करडा अम्मल चालू असल्यामुळें तेच लोक आतां फार गरीब, सालस, परवशतासहिष्णु आणि शांतताप्रिय असे झालेले आहेत. अद्यापिही हे लोक सुदृढ व काटक असे दिसतात. त्यांच्या अंगावरील व विशेषतः तोंडावरील केसांची वाढ जास्त होत असल्यामुळें त्यांस ' येमिशी ' ( केसाळ रानटी लोक ) असेंही म्हणत. ऐनो ( कुत्रे, नीच ) हा शब्द जपानी लोकांनीं त्यांचेविषयीं तिरस्कारबुद्धि व्यक्त करण्याकरितां योजलेला आहे. परंतु ते लोक आपणांस ऐनो अथवा येमिशी असें म्हणवून न घेतां येझो असें म्हणवून घेतात. कदाचित् येझो बेटाच्या नांवावरूनच त्यांनीं हें नांव धारण केलें असेल. हे लोक अद्यापिदेखील आपल्या इकडील भिल्ल, गोंड, वगैरे जातीप्रमाणेंच रानवट आहेत. शिक्षणाचीं अथवा सुधारणेचीं कोणतींहि चिन्हें या लोकांमध्यें दिसून येत नाहींत. धर्माविषयीं यांच्या कल्पना अगदीं संदिग्ध व असंबद्ध अशा आहेत.

ऐनो लोकांपेक्षांही रानटी जात जपानांत पूर्वी असल्याचें पुराव्यावरून सिद्ध होतें. परंतु यांचा आतां कोठें मागमूसही नाहीं. येझो बेटांत यांचीं अगदीं मोडकळीस आलेलीं वसतिस्थानें कांहीं ठिकाणीं आढळून येतात. चिशिमा बेटें व कामस्चाटका या भागांत या जातीचे अवशिष्ट लोक अद्यापिही कचित्स्थळीं सांपडतात. ऐनो लोकांनीं यांस भूछिद्रवासी अशा अर्थानें नांव दिलें होतें व जपानी लोक यांना कोबिटो ( खुजे )

असें ह्मणत होते. या लोकांस शेपटें होतीं असें कोजिकी नांवाच्या जपानच्या जुन्या इतिहासावरून समजतें. हे लोक खुजट असून जमिनीवर घरें बांधून न राहतां जमिनीमध्यें गृहें करून रहात असत; व ह्मणूनच दोन जातींनीं यांस दोन भिन्न नांवें दिलीं आहेत. या भूगृहांत (भुयारांत) राहणाऱ्या लोकांचा ऐनो व जपानी ह्या दोनही जातींच्या लोकांनीं संहार केला ह्मणून त्यांचा इतक्या लवकर समूळ नाश झाला.

जपानी लोकांमध्येंहि दोन प्रकार आढळून येतात. जपानच्या दक्षिण भागास जे लोक राहतात ते उत्तरेकडील लोकांपेक्षां जरा नाजूक, सतेज, किंचित् लंबमुख, वक्रदृष्टि, सरळ आणि तरतरीत नाकाचे व साधारण कृश परंतु बांधेसूद असे असतात; व काबाडकष्ट करून उपजीविका करणाऱ्या लोकांपेक्षां सुस्थितींत असलेल्या लोकांमध्यें वरील लक्षणें प्राधान्येंकरून दृष्टोत्पत्तीस येतात. उत्तरेकडेही हीच स्थिति आहे; पण वरील लक्षणांचे लोक श्रीमान् लोकांतच आढळतात. दोनही भागांतील खालच्या प्रतीचे लोकांचीं तोंडें रुंदट व चपटीं, डोळे सरळ, नाकें पसरट व लहान आणि शरीरें स्थूल व बळकट असतात, परंतु समप्रमाण नसतात. हे किंचित् ठेंगणे असून थोडे काळसरही आहेत व यांच्या अंगावर केंस पहिल्या प्रकारच्या लोकांपेक्षां विपुल असतात. परंतु ह्या लोकांचा भरणा उत्तरेकडे विशेष आहे. वर दोनही प्रकारच्या लोकांचीं जीं लक्षणें दिलीं आहेत तीं त्या त्या प्रकारांतील पुरुषांपेक्षां स्त्रियांस विशेषतः लागू पडतात. जपानांतील कुलीन स्त्रिया आशियांतील कोणत्याही इतर राष्ट्रांतील स्त्रियांपेक्षां फार सुरेख आहेत. वरील दोनही प्रकारच्या लोकांमध्यें संकर झाल्यामुळें वरील लक्षणांचेंहि संमिश्रण बरेंच झालेलें आहे. जातिज्ञानविशारदांचें असें मत आहे कीं, ऐनो व जपानी हे एकाच मोंगोलियन शाखेचे लोक असून त्या शाखेच्या सुधारणेच्या निरनिराळ्या अवस्थेंत असतांना त्यांनीं भिन्न भिन्न युगांमध्यें जपानांत प्रवेश केला. ऐनो लोक अगदीं पहिल्यानें

उत्तरेकडून व मागाहून जपानी लोक निरनिराळ्या कालीं दोन वेळां दक्षिणेकडून जपानांत घुसले. जपानीं लोकांचें शेवटचें निर्याण इ. सनापूर्वीं ६९० च्या सुमारास झालें. जपानीं लोकांत साधारणपणें ४॥ फुटांपासून ५। फुटांपेक्षां किंचित् जास्त उंची पुरुषांची व ४॥ फुटांपासून ५ फुटांपेक्षां किंचित् कमी इतकी उंची स्त्रियांची असते. व शरीराच्या मानानें यांचे डोकें मोठें असतें, एकंदरींत हे लोक नीतीसंपन्न व फार बुद्धिमान् आहेत.

# बादशाही सत्तेचा काल.

२

ज्या लोकांनीं ग्रीस, रोम अथवा इंग्लंड या देशांचे इतिहास किंवा आपल्या महाराष्ट्राचा चिमुकला इतिहास लक्षपूर्वक वाचला असेल त्यांस जपानच्या इतिहासाची योग्यता फार मोठी आहे असें मुळींच वाटणार नाहीं. जपान आशियाखंडापासून अलग व समुद्रवेष्टित असल्यामुळें मुख्य द्वीपावरील राष्ट्रांशीं त्याचा संबंध फारच कमी होता. ह्या जपानच्या एकलकोंडेपणामुळें परकीयांशीं दळणवळण ठेविल्यापासून होणारे फायदे त्यांनीं अगदीं अलीकडच्या काळापर्यंत करून घेतले नाहींत. कोरिया-शिवाय इतर राष्ट्रांशीं युद्धप्रसंग क्वचित् घडल्यामुळें दुसऱ्या बलाढ्य राष्ट्रांच्या मानानें जपानच्या अंगीं त्याच्या भर उमेदींत कितीसा जोम होता हें पाहण्याची संधि मिळाली नाहीं; व राज्यकारस्थानासंबंधीं भानगडी उपस्थित होऊन त्यांचा व्यवस्थित रीतीनें निकाल लावण्याचें चातुर्यही दिसून येत नाहीं. आशि-यांतील स्थूल व शुद्ध राजनीतितत्वांचाही ज्या राष्ट्रास संसर्ग नव्हता, त्यास अलीकडील दूरदर्शीपणाच्या कुटिल व सूक्ष्म अशा पाश्चात्य राज-नीतितत्वांचा गंधदेखील नव्हता ह्यांत आश्चर्य नाहीं. ह्या व इतर अनेक कारणांमुळें जपानचा इतिहास बराच नीरस वाटतो; व गेल्या दहा वर्षांत जपानची सर्व बाजूंनीं ‘ न भूता न भविष्यति ’ अशा प्रकारची जरी अभिवृद्धि झाली आहे व जरी त्यास पृथ्वीवरील चार पांच बलाढ्य राष्ट्रांमध्यें बहुमानाचें स्थान आज मिळत आहे, तरी ज्या कालाविषयीं जपानची ऐतिहासिक माहिती संक्षिप्त रीतीनें देण्याचा माझा विचार आहे, त्या कालापुरताच जर विचार केला तर वरील विधान बिलकुल चुकीचें नाहीं हें वाचकांच्या सहज लक्षांत येईल. तथापि जपानचा इतिहास अगदींच टाकाऊ नसून त्यांतील कांहीं मनोरंजक व बोधप्रद उपकथानकांचें परिशीलन प्रत्येकानें करावें इतक्या योग्य-तेचा तो आहे.

जपानच्या इतिहासाचे साधारण स्थूल मानानें तीन भाग करितां येतील. १ ला—बादशाही सत्तेचा काल; २ रा—शोगन ( पेशवे, दिवाण ) यांच्या अमदानीचा काल व ३ रा—आधुनिक सुधारणेचा, ज्ञानवृद्धीचा व शांततेचा काल. ह्यासच जागृतीचा काल असेंही ह्मणतां येईल. यापैकीं शेवटच्या कालाविषयीं सविस्तर माहिती योग्य स्थळीं येईलच. पहिल्या दोन कालांसंबंधीं पूर्ण हकीकत दिल्यास वाचकांचा विलकुल फायदा न होतां त्यांस कंटाळा मात्र येईल; सबब त्यांतील मुख्य मुख्य गोष्टींचाच उल्लेख करणें जरूर आहे. जपानच्या बादशाही तक्तावर एकाच घराण्यांतील मनुष्यें आज सुमारें २५६० वर्षें अबाधितपणें अधिरूढ झालीं आहेत ही गोष्ट जपानास विशेष भूषणास्पद व अभिमानास्पद आहे. इतकें जुनें राजघराणें आज पृथ्वीच्या पाठीवर एकही नाहीं. या घराण्याचा मूळ पुरुष जिमु हा होता. हा सूर्याचा वंशज होता, ह्मणून या घराण्यांतील सर्व राजे सूर्यवंशीय होत. हा आपल्या वडील भावासह कोरियांतून क्यूशु बेटांत आला व हळूहळू प्रांत काबीज करीत करीत विशाल द्वीपांत शिरला. तेथें नागसुने नांवाचा राजा राज्य करीत होता त्याच्याशीं युद्ध करून त्यानें विजय मिळविला. या युद्धांत याचा भाऊ मारला गेला. नंतर ऐनो लोकांशीं व सपुच्छ भूगृहवासी रानटी लोकांशीं युद्ध करून त्यांचा पराभव करून पुष्कळ मुलुख हस्तगत केला व काशीवारा येथें तो तळ देऊन राहिला. हेंच ठिकाण त्याच्या राजधानीचें शहर झालें. नंतर टेनो ( बादशहा ) असा किताब धारण करून इ० स० पूर्वीं ६६० या वर्षीं जिमुनें जपानच्या राज्याची स्थापना केली. जिमु टेनोनंतर गादीवर बसलेल्या सर्वच बादशहांचीं नांवें व त्यांच्या कारकीर्दी देण्यांत कांहीं अर्थ नाहीं. जिमूपासून १० वा बादशहा सुजिन हा झाला. याचेवेळीं राज्यांत रोगाची भयंकर साथ उद्भवली होती. परंतु रुष्ट देवतेची यथासांग पूजा केल्यावर ती बंद झाली. रोगामुळें देश जरी ओसाड झाला होता तरी याच्या राज्यांत सर्वत्र शांतता असून प्रजाही सुखी होती. यानें तळीं बांधलीं, कालवे

काढले व देशांतील सर्व प्रकारच्या उद्योगांस उत्तेजन दिलें. शिकार केलेल्या जनावरांवर व स्त्रियांनीं हातांनीं तयार केलेल्या जिनसांवर यानेंच प्रथम कर बसविला. उत्तरेकडे स्वाऱ्या करून यानें पुष्कळ मुलुख आपल्या राज्यास जोडिला. याचेमागून याचा मुलगा सुइनिन हा गादीवर बसला. हा फारच कोमळ अंतःकरणाचा होता. याचा भाऊ मरण पावल्यावर त्यावेळच्या रीतीप्रमाणें त्याचे सर्व चाकर व घोडे त्याच्याबरोबर मानेपर्यंत पुरण्यांत आले. रात्रीं त्यांच्या केविलवाण्या, अतिदुःखाच्या, भयंकर व हृदयभेदक किंकाळ्या ऐकून बादशहास फार वाईट वाटलें च दुसरे दिवशीं सजीव प्राण्याबद्दल मातीच्या मूर्ति करून प्रेताबरोबर पुराव्या असें त्यानें फर्माविलें. इ. स. पूर्वीं पहिल्या शतकांत जरी हा हुकूम केलेला होता तरी तो पूर्णपणें अमलांत येण्यास सुमारें ८०० वर्षें लागलीं; व पुढेंही सतराव्या शतकापर्यंत ह्या रूढीचा लोकांच्या मनावर बसलेला पगडा नाहींसा झाला नाहीं. याचेमागून कैको बादशहा गादीवर बसला. याची कारकीर्द याचा मुलगा ओउसु ( यालाच पुढें यामाटो डेक हें नांव मिळालें. ) याचे पराक्रमाविषयीं प्रसिद्ध आहे. यानें क्यूशु बेटांतील दोघा बंडखोर भावांस फार जेरीस आणिलें व त्यांनीं एका समारंभाकरितां कांहीं स्त्रियांस बोलाविलें होतें, त्यावेळीं हाही स्त्रीचें सोंग घेऊन त्यांच्या लपून बसण्याच्या जागेंत इतर स्त्रियांबरोबर गेला. स्त्रीचें सोंग याला इतकें चांगलें साजलें कीं, त्याचें तें अप्रतिम सौंदर्य पाहून दोघांनीं त्याला आपल्यामध्यें बसवून त्याच्याशीं कामी जनांस उचित अशा चेष्टा आरंभिल्या. ही संधि साधून त्यानें आपली लपविलेली तरवार काढून दोघांचेहि प्राण घेतले. नंतर त्या प्रांतांत सर्वत्र शांतता करून तो पूर्वेकडे गेला. एके प्रसंगीं यदोचें आखात तरून जात असतांना फार मोठें वादळ सुटलें; तेव्हां याच्या बायकोनें वादळ शांत होण्याकरितां समुद्रांत उडी टाकिली व लागलेंच वादळ शांत झालें अशी कथा सांगतात. नंतर उत्तरेकडे मोर्चा फिरवून ऐनो लोकांस त्यानें हाकून लाविलें व अशा रीतीनें बहुतेक विशाल द्वीप जिंकून घेतल्यावर तो आपल्या वयाच्या ३२ व्या

वर्षी मरण पावला. जपानचा चौदावा बादशहा चुए हा होता. याचे मनांत चोसेन ( कोरियाचें जुनें नांव ) वर स्वारी करावयाची असल्यामुळें तो विशाल द्वीपांत न राहतां युद्धाची तयारी करण्याकरितां क्यूशु बेटांतच येऊन राहिला होता. परंतु याचा मनोरथ पूर्ण होण्यापूर्वीच हा निवर्तला. तथापि याची राणी मोठी पराक्रमी व निश्चयी असल्यामुळें तिनें आपल्या नवऱ्याच्या मनांतील हेतु सिद्धीस नेण्याचा संकल्प केला व इ. स. २०२ मध्यें आपल्या प्रधानाच्या साहाय्यानें मोठ्या सैन्यानिशीं कोरियावर स्वारी केली. कोरियाचे या वेळीं कोराई, शिराकी व कुडरा असे तीन मोठे विभाग असून प्रत्येक विभागावर एक राजा राज्य करीत असे. जपानच्या सैन्याशीं तोंड देण्याची कोणत्याही राजाची तयारी नसल्यामुळें ते जिंगो राणीस शरण गेले व प्रत्येकानें मोठी खंडणी जपानांत नेऊन पोहोंचविण्याचें कबूल करून ते जपानचे मांडलिक झाले. याप्रमाणें ठराव झाल्यावर ती इ. स. २०४ मध्यें जपानांत परत आली. जपानचा हा विजय त्याच्या भावी प्रगतीस बराच कारणीभूत झाला. जिंगो राणीचा मुलगा ओजीन ह्याची कारकीर्द बरीच महत्वाची होती. ह्याचा जन्म होण्याचे अगोदरच ह्याच्या आईनें कोरियामध्यें पराक्रम गाजविला ह्मणून यास हचीमान् ( रणदेव ) असें बहुमानाचें नांव देण्यांत आलें. ह्याच्या स्वतःविषयीं फारशी हकीकत जुन्या इतिहासांत आढळून येत नाहीं. याच्यामागून याचाच मुलगा निंटोकु हा गादीवर बसला. हा फार बुद्धिमान् व ज्ञाता होता. लहानपणीं यानें चीनी भाषेचा चांगलाच अभ्यास केला होता व कान्फूशस् नांवाच्या चिनी तत्वज्ञाचीं तत्वेंहि त्यास अवगत होतीं. प्रजा मोठमोठ्या करांच्या भारानें अगदीं निःसत्व झाली आहे असें पाहून यानें तीन वर्षेपर्यंत सर्व कर माफ केले व आपणास हालअपेष्टा सोसाव्या लागल्या तरी त्या शांतपणें सहन केल्या इतकेंच नाहीं तर लोकांनीं स्वसंतोषानें त्यास जें जें अर्पण केलें त्या सर्वांचा त्यानें अव्हेर केला. या त्याच्या कृत्यामुळें देशांत जिकडे तिकडे समृद्धि व संतोष हीं दिसूं लागलीं व त्यास 'सुज्ञ' हें नांव मिळालें. यानेंच प्रथम जपानच्या इतिहासाचीं साधनें मिळविण्याकरितां

प्रांतोप्रांतीं विद्वान् लोक पाठविले. हा इ. स. ३९९ मध्यें मरण पावला. ह्याच्यामागून गादीवर बसलेले दहा बारा राजे बहुतेक अप्रसिद्ध आहेत. या राजवंशांतील पंचवीसावा राजा फार क्रूर व व्यसनासक्तही होता. याचा मुलगा कैटे हा गादीवर बसल्यावर त्यानें कोरियावर स्वारी केली. पुढें २९ वा बादशहा किमै हा राज्य करीत असतांना इ. स. ५५२ या वर्षी कोरियांतील कुडारा देशाच्या राजानें आपल्या वकीलाबरोबर वार्षिक खंडणी पाठवून त्याचेबरोबरच बौद्धधर्माचे ग्रंथ व शाक्यमुनीची एक मूर्ति पाठविली. बौद्धधर्माचीं तत्वें वाचून त्याचें मन बरेंच सुसंस्कृत झालें. या नवीन धर्माचा प्रसार व्हावा अशी याची व याचा प्रधान इनामे याची फार इच्छा होती; परंतु शिंटोधर्मीय मंत्रिमंडळानें ह्यास आपली फार प्रतिकूलता दर्शविल्यामुळें बादशहास या बाबतींत विशेष कांहींच करितां आलें नाहीं. याचा पुत्र बिटत्सु हाही बौद्धधर्माभिमानी असून त्यानेंही गादीवर बसल्यानंतर आपले बापाप्रमाणेंच आपल्या प्रधानाच्या अनुमतानें धर्मप्रसार करण्याची खटपट केली व प्रथम जरी ह्या कामांत त्यास बराच अडथळा आला तरी शेवटीं प्रतिपक्षाचे पुढारी मारले जाऊन बादशहास आरंभलेल्या कार्यांत चांगलेंच यश प्राप्त झालें. ह्याप्रमाणें बौद्धधर्माचा हळू हळू प्रसार होत चालला व सुइको राणीच्या राज्यकालांत ह्मणजे ५९३-६२८ पर्यंत त्या धर्माची विशेष प्रगति झाली. हिचा भाचा ओजी हा युवराजपदारूढ होता. हा जन्मल्यापासूनच बोलावयास लागला होता असें ह्मणतात. एकाच वेळीं हा अनेक गोष्टींकडे लक्ष पुरवीत असे ह्मणून यास अष्टावधानी असें ह्मणत असत. धर्मप्रसारार्थ यानें व्यक्तिशः आपल्या आयुष्यांत जितके श्रम केले तितके जपानांत आजपर्यंत कोणीही केले नाहींत. यानें प्रजेस व अधिकारिवर्गास आपलें कर्तव्य कसें बजावावें याविषयीं उत्कृष्ट नियम घालून दिले व चीन व कोरिया या दोन सुधारणेच्या शिखरास पोहोंचलेल्या राष्ट्रांत प्रचलित असलेली राज्यपद्धति किंचित् फेरफार करून जपानांत सुरू केली. बौद्धधर्माचा प्रसार करण्यासाठीं यानें जन्मभर जे अविश्रांत परिश्रम केले त्यामुळें तो मरण पावल्यावर त्यास

' शोटोकु टैशी ' ( धर्माचार्यश्रेष्ठ ) अशी पदवी मिळाली. त्यानें सदाचाराचे जे नियम घालून ठेविले आहेत त्यांस जपानीलोक अजूनही फार मान देत आहेत. चीनी पंचांगही यानेंच प्रथम जपानांत सुरू केलें. हा इ. स. ६२२ मध्यें मरण पावला. सुइको राणीनंतर नांव घेण्यासारखा बादशहा ह्मटला ह्मणजे राजघराण्यांतील ३८ वा पुरुष टेंजी हा होय. ह्यानें इ. स. ६६८ पासून फक्त तीन वर्षें राज्य केलें. ह्यानें शिक्षणप्रसार व्हावा ह्मणून एक शाळा स्थापन केली. हीच याचे कारकीर्दीतील मुख्य गोष्ट होय. स्वतंत्र रीतीनें राज्यकारभार पाहणाऱ्या बादशहांपैकीं हा शवटचाच होय. याच्या मरणानंतर बादशाही तक्तावर बसलेले सर्व राज्यकर्ते केवळ नामधारी असून वास्तविक सत्ता कांहीं विशिष्ट घराण्यांतील पुरुषांच्या हातामध्यें असे. जिमूपासून टेंजीपर्यंत ह्मणजे सुमारें १२०० वर्षेपर्यंत बादशाही सत्ता अबाधित होती. या कालांतील जपानची कामगिरी ह्मटली ह्मणजे जपानचा बहुतेक भाग हस्तगत करून घेऊन भक्कम पायावर राज्याची स्थापना करणें, राज्यकारभारांत सुधारणा आणि भौतिक उन्नति करणें व बौद्धधर्माची स्थापना व प्रसार करणें ही होय.

पुढील १२०० वर्षांत ह्मणजे टेंजीपासून हल्लीं राज्य करणारा बादशहा मुत्सुहितो हा १८६८ मध्यें गादीवर बसेपर्यंत सर्व बादशहा शोगनांच्या हातांतील कळसूत्री बाहुलीं होऊन ते जसें नाचवितील तसें नाचण्यास तयार होते. बादशहांची सत्ता नामशेष होऊन शोगन हे वास्तविक राज्यकर्ते झाले एवढेंच नव्हे तर ते राजकर्तेंही बनले. या कालाचा इतिहास थोडा महत्वाचा असल्यामुळें तो संक्षेपेंकरून पुढील प्रकरणांत दिला आहे.

---

# मध्ययुग.

## शोगनांच्या प्राबल्याचा काल.

### ३

ह्या कालाचा इतिहास ह्मटला ह्मणजे जपानचीं राज्यसूत्रें आपल्या हातीं ठेवण्याकरितां कांहीं महत्वाकांक्षी व शूर पुरुषांनीं केलेल्या उलाढालींचें वर्णन होय. एका पुरुषाच्या हातीं ही सत्ता आली कीं वंशपरंपरेनें त्याच्याच घराण्यांतील पुरुषांच्या हातांत ती राही व दुसऱ्या प्रबल घराण्यांतील शूर पुरुषानें हिरावून घेतल्यानंतर ती त्याच्या व त्याचे वंशजांच्या हातीं जाई. ह्याप्रमाणें टेंजी बादशहाच्या मरणानंतर सात घराण्यांतील पुरुषांनीं जपानचीं राज्यसूत्रें आपल्या हातीं वागविलीं; व इ० स० १८६८ मध्यें तीं पुन्हा हल्लीं राज्य करीत असलेल्या बादशहाचे हातीं आलीं. वर सांगितलेल्या रीतीनें जीं घराणीं प्रसिद्धीस आलीं त्यांपैकीं फुजिवारा घराणें पहिलें होय. हें घराणें राजघराण्याइतकेंच जुनें होतें. ह्या घराण्याचा अभ्युदय सुमारें सातव्या शतकाच्या मध्यभागीं कामातारी नांवाच्या दैववान् पुरुषामुळें झाला. कांहीं वर्षेपर्यंत मोठ्या मानाचीं व अधिकाराचीं कामें केल्यावर हा डैजो डैजीन ह्मणजे मुख्य प्रधान झाला. टेंजीच्या मागचे सर्व बादशहा चैनी, व्यसनासक्त व स्त्रीलंपट असल्यामुळें राज्यकारभाराचा बोजा प्रधानावरच पडे. प्रधान करील ती पूर्व दिशा, अशी स्थिति असल्यामुळें मोठमोठ्या हुद्याच्या बहुतेक सर्व जागा यानें आपल्या आप्तमंडळीस दिल्या. हें घराणें जुनें व कुलीन असल्यामुळें बादशहांचीं लग्नें याच घराण्यांतील बायकांशीं होत व त्यांच्या उपपत्नीही याच कुलांतील असत; यामुळें यांच्या द्वारें स्त्रीलंपट बादशहांवर आपली छाप ठेवण्यास फुजिवारा घराण्यांतील प्रधानांस कांहींच कठीण पडत नसे. एकादा बादशहा

समंजस व महत्वाकांक्षी असेल तर राज्यपदाचा त्याग करावयास लावून आपलें वर्चस्व ते नेहमीं कायम ठेवीत असत. कामातार्दा जसा राजकार्यधुरंधर व चतुर होता तसेच त्याचे वरेच वंशजही होते; यामुळें प्रधानकी अथवा पेशवाई या एकाच घराण्यांत सुमारें चारशे वर्षेपर्यंत वंशपरंपरेनें चालत राहिली. हे पेशवे दिवाणी कामांतच विशेष लक्ष घालीत असल्यामुळें युद्धकलेची यांना बिलकुल माहिती नव्हती. अर्थात् जेव्हां उत्तरेकडे येमिशी लोकांवर अथवा क्यूशु बेटांतील बंडखोर सरदारांवर सैन्य पाठविण्याचा प्रसंग येई तेव्हां दुसऱ्या घराण्यांतील युद्धप्रवीण पुरुषांस अशा प्रकारच्या मोहिमेवर पाठविणें भाग पडे. अशा प्रकारचे प्रसंग वारंवार येऊं लागल्यामुळें देशामध्यें उत्तम सेनापती तयार झाले व त्यांच्या मागें लढाईस जाण्यास सदैव तयार असे उत्तम सैनिकही उत्पन्न झाले. अशा रीतीनें जपानांत ह्यावेळीं एक क्षत्रियवर्ग उत्पन्न झाला; व ह्या वर्गाचें पूर्ण पाठबळ असल्यामुळें कांहीं घराण्यांतील सेनापती महत्वाकांक्षी बनले व आपला राज्यकारभारामध्येंही हात असावा असें त्यांस वाटूं लागलें. अशाप्रकारचीं घराणीं ह्मटलीं ह्मणजे टैरा व मिनामोटो हीं होत. हीं घराणीं ९ व्या शतकांत बादशहांच्या उपपत्नीपासून उत्पन्न झालीं व केवळ आपल्या बाहुसामर्थ्यानें प्रसिद्धीस येऊन नंतर फुजिवारा घराण्याच्या अपकर्पास कारणीभूत झालीं. कालांतरानें सर्व राज्यसूत्रें डैजो डैजीन ( पेशवे ) यांच्या हातांतून निघून तीं शोगन ( सेनापती ) यांच्या हातांत आलीं; व हीच स्थिति इ० स० १८६८ पर्यंत कायम राहिली. असो.

इ० स० १०५० पासून फुजिवारा घराण्यास उतरती कळा लागल्यावर टैरा घराण्याचा एकसारखा उत्कर्ष होत चालला. या घराण्यांतील अतिशय प्रसिद्ध पुरुष ह्मटला ह्मणजे कियोमोरी हा होय. हा बाराव्या शतकाच्या द्वितीय अर्धांत डैजो डैजीन ( मुख्य प्रधान ) होता. इ० स० ११५९ मध्यें बादशाही तख्तावर कोणी बसावें याबद्दल वाद उपस्थित झाला. त्यावेळीं ह्यानें राजकुलांतील आपल्या जामाताचा

पक्ष धरिला व वर निर्दिष्ट केलेल्या मिनामोटो घराण्यानें राज-घराण्यांतील दुसऱ्या व खऱ्या वारसाचा पक्ष उचलला. पुढील सालीं दोनही पक्षांमध्यें एक मोठी निकराची लढाई झाली; तींत कियोमोरीचा विजय झाला व यामुळें तो वैभवाच्या शिखरास जाऊन पोहोंचला. सर्व हुद्याच्या जागा यांचे कुळांतील मनुष्यांस मिळाल्या व अधिकाराच्या जोरावर तो पुष्कळ अनन्वित कृत्यें करूं लागला. हें मिनामोटो घराण्यांतील योशिटोमो यास सहन न होऊन त्यानें फुजि-वारा घराण्यांतील सरदारांच्या साहाय्यानें त्यास पदच्युत करण्याचा कट केला. परंतु तो उघडकीस आल्यामुळें कियोमोरीनें जीं जीं घराणीं त्यांत सामील होतीं त्या सर्वांचा उच्छेद करण्यास आरंभ केला. योशिटोमो याचा ज्येष्ठ मुलगा योरिटोमो यास मात्र कांहीं वजनदार लोकांच्या मध्यस्थीवरून दूरच्या एका बेटांत हद्दपार करण्यांत आलें. योशिटोमो याची टोकिवा नांवाची सुस्वरूप दासी होती. हिच्यापासून त्याला कांहीं मुलें झालीं होतीं. संकटकालीं मुलांचें प्राणरक्षण व्हावें ह्मणून तिनें कियोमोरीची दासी होण्याचें कबूल केलें. तिच्या स्वरूपास भुलून जाऊन त्यानेंही ती गोष्ट मान्य केली; व तिच्या मुलांचे प्राण न घेतां त्यांस निरनिराळ्या मठांत धर्मतत्त्वांचा अभ्यास करण्यास पाठविलें. परंतु योषित्सुने नांवाच्या मुलाचा कल धर्माकडे मुळींच नसल्यामुळें त्यानें अस्त्रविद्येंतच नैपुण्य संपादिलें. पुढें सोळा वर्षांचा झाल्यावर ह्यास भिक्षु होण्याविषयीं मठा-धिपति आग्रह करूं लागला. हें त्यास पसंत नसल्याकारणानें संधि पाहून एका व्यापाऱ्याबरोबर तो मित्सु संस्थानांत पळून गेला व तेथें सैन्यांत चाकरी धरली; व अनेक युद्धांत लढण्याचा प्रसंग आल्यामुळें तो मोठा योद्धा झाला.

इकडे योरिटोमो कांहीं सरदारांच्या मदतीनें टैरा घराण्याच्या नाशास प्रवृत्त झालेला होता; व एका प्रयत्नांत याच्या सर्व अनुयायिवर्गाचा नाश होऊन हा जरी मोठ्या सुदैवानें वांचला होता तरी धीर न सोडतां तो आपला हेतु तडीस नेण्याच्या तयारीस लागला.. ह्यावेळीं त्यास

चांगलीच मदत मिळाली. त्याचा चुलत भाऊ योषिनाका व दासीबंधु योषित्सुने हेहि त्यास येऊन मिळाले व अशा रीतीनें युद्धाची पूर्ण तयारी झाली. इतक्यांत इ. स. ११८१ मध्यें कियोमोरी हा मरण पावला व त्याचा मुलगा मुनेमोरी हा टैरा घराण्याचा नायक व प्रधान झाला. ही संधि साधून योरिटोमोनें राजधानीवर स्वारी करून मुनेमोरी व बादशहा यांस पळावयास लाविलें. ते शिकोकु बेटांत जाऊन राहिले. इकडे टैरा घराण्याचा पराभव केल्यामुळें योषिनाका हा गर्वानें फुगून गेला व योरिटोमोचाहि द्वेष करूं लागला; ह्मणून योरिटोमोनें योषित्सुनेस मोठ्या सैन्यासह त्याच्या विरुद्ध लढाई करण्यास पाठविलें. योषित्सुने यानें बिवा सरोवरानजीक योषिनाकाचा पराभव करून पळून गेलेल्या टैरा व बादशाही सैन्याचा पाठलाग केला; व डान-नो-डरा जवळ टैरा सैन्याचा दर्यायुद्धांत पराभव करून व टैरा घराण्यांतील सर्व पुरुषांस व बायका-मुलांस ठार मारून विजयचिन्हें आपल्या भावास समर्पण करण्याकरितां उत्तरेकडे निघाला. परंतु योरिटोमोच्या मनांत याचेविषयींहि मत्सर उत्पन्न झाला व त्यास भेटीस न येण्याची आज्ञा केली. ही आज्ञा त्यानें शिरसा मान्य केली व पुढें कदाचित् आपल्या जीवासही धक्का बसेल या भीतीनें तो आपल्या एका बेंकै नांवाच्या चाकरासह मित्सु देशांत गेला. पण थोडेच काळांत यास ठार मारण्यांत आलें. बेंकै व योषित्सुने ह्याच्यासंबंधीं पुष्कळ कथा जपानांत प्रसिद्ध आहेत. यामाटोडाके प्रमाणेंच योषित्सुने यास जपानी लोक अद्यापिदेखील फार पूज्य मानितात. असो.

याप्रमाणें सर्व अडचणी दूर झाल्यावर इ. स. ११८४ मध्यें योरिटोमो हाच राज्यसूत्रचालक झाला. पूर्वींच्या पद्धतीप्रमाणें यानें डैजो डैजिन ( मुख्य प्रधान ) ही पदवी धारण न करितां सै-इ-टे शोगन ( मुख्य सेनापति ) हा किताब बादशहाकडून मिळविला व सेनापति या नात्यानेंच तो मुलकी काम पाहूं लागला व ह्मणूनच यास शोगन-

ह्मणून यानें प्रथम मंत्रिमंडळ स्थापन केलें व फौजदारी गुन्ह्यांची चौकशी करण्याकरितां न्यायगृहें स्थापन केलीं. लष्करी खर्च भागविण्याकरितां जमिनीवर कर बसविला. मोठमोठ्या मठांतील भिक्षूंनीं शस्त्रें बाळगूं नयेत असें फर्माविलें व इतर लहानसान सुधारणा यानें केल्या. तथापि ज्या गोष्टीबद्दल याची विशेष प्रसिद्धि आहे ती गोष्ट ह्मटली ह्मणजे त्यानें सुरू केलेली जहागिरदारी पद्धत होय. ह्या वेळेपर्यंत राजकुळांतील अथवा राजदरबारांतील बादशहाचे मर्जीतील लोक कोकुशू अथवा सुभेदार ह्मणून प्रांतांतील राज्यव्यवस्था पाहण्यास पाठविण्याची चाल असे. परंतु योरिटोमोनें त्यांच्या मदतीस एक एक शियूगो अथवा लष्करी अधिकारी पाठविण्याची परवानगी मिळविली. हे शियूगो शोगनच्या आधीन असत, व कालेंकरून शोगनांनीं ज्याप्रमाणें डैजीनांची सत्ता बळकावली त्याच प्रमाणें शियूगोनीं कोकुशूंची सत्ता बळकावली. या पद्धतीचा नंतर कसा विकास झाला याविषयीं हकीकत पुढें दिली आहे. तथापि या पद्धतीचा तात्कालिक हितकारक परिणाम ह्मटला ह्मणजे देशांत कित्येक शतकानंतर शांतता वास करूं लागली व लोकही सुखी झाले हा होय. ह्या गोष्टीमुळेंच योरिटोमो फार लोकप्रिय झाला.

क्योटो येथील परिस्थितीमुळें बादशहा जसे चैनी, व्यसनी व दुर्बल बनले होते तसे आपल्या वंशजांनीं न व्हावें ह्मणून योरिटोमोनें आपलें राहण्याचें ठिकाण कामाकुरा येथें मुकरर केलें. तथापि त्याच्यामागें त्याच्या इच्छेप्रमाणें कांहीं एक घडलें नाहीं. याचेमागून बसलेले कांहीं शोगन याच्याच घराण्यांतील, कांहीं फुजिवारा घराण्यांतील व कांहीं राजघराण्यांतीलही होते. परंतु ते अज्ञान असल्यामुळें व ते जरी सज्ञान झाले तरी त्यांस अधिकार त्याग करावयास लागून त्यांचे जागीं पुनः बालशोगन अधिकारारूढ झाल्यामुळें होजो घराण्यांतील पुरुष वंशपरंपरेनें शिकन (प्रतिनिधि) होत असत. कधीं कधीं हे शिकनदेखील अज्ञान असल्यामुळें ह्यांस आणखी उपप्रतिनिधि लागत असत. ह्यामुळें राज्यांत बेबंदशाही माजली. दरबारांतील लोक शीलभ्रष्ट व दुराचारी झाले. प्रजेस न्याय मिळेनासा

झाला व राज्य मोडकळीस येण्याच्या पंथास लागलें. इतक्या निकृष्टावस्थे-प्रत जरी देश यावेळीं येऊन पोहोंचला होता तरी जपानी लोकांच्या अंगांतील क्षात्रतेज अद्यापिही कायम आहे हें दाखविण्याचा प्रसंग ह्याच वेळीं त्यांस आला. तो असा. कुबलाईखान नांवाच्या एका मोगल राजानें चीन देशावर स्वारी करून तथील संग घराण्यास पूर्णपणें जिंकून आपण मोठ्या वैभवानें राज्य करूं लागला. पुढें त्यानें जपान देश अतिशय सुसंपन्न आहे असें ऐकिलें व तो आपल्यास सहज घेतां येईल असें त्यास वाटलें. परंतु हें काम सामोपचारानें झाल्यास पहावें ह्मणून खानानें आपला वकील जपानांत पाठवून त्याचेबरोबर 'माझा अम्मल मुकाट्यानें कबूल करा' असा निरोप पाठविला. या निरोपास चरचरीत प्रत्युत्तर देऊन व वकीलाचा भरदरबारांत अपमान करून मोठ्या तिर-स्कारानें त्यास परत पाठविण्यांत आलें. वकिलाची अशा प्रकारें संभा-वना झाल्यावर खान फार क्रुद्ध झाला व एक मोठें सैन्य कोरियांतील व चीन देशांतील जहाजांतून जपानाकडे रवाना केलें. या सैन्यानें त्सुशिमा बेट हस्तगत केलें व आतां जपानी लोक खास शरण येतील असें वाटून पुनः एकदां वकीलमंडळ शोगनकडे रवाना झालें. वकीलांनीं पूर्वीप्रमाणेंच उद्धटपणाचा निरोप आणिल्याकारणानें त्यांस ठार मारण्यांत आलें व ह्या रीतीनें खानाशीं दोन हात करण्याचा आपला निश्चय जपाननें प्रकट केला. नंतर लागलींच खानाचें एक लाख सैन्य क्यूशु बेटांत येऊन उतरलें. ह्या सैन्याशीं लढण्याकरितां मोठें सैन्य जमा करून टोकिमुने त्या बेटांत गेला; व इ० स० १२८१ मध्यें एक जंगी लढाई होऊन खानाचा पराभव झाला. ह्याचवेळीं एक मोठें तुफान झालें व त्याच्यायोगानें खानाच्या सर्व जहाजांचा नाश झाला. जपानवर स्वारी करण्याचा आजपर्यंत एवढाच प्रयत्न झाला व त्याचाही वरीलप्रमाणें शेवट झाला.

हा आणीबाणीचा प्रसंग कसातरी पार पडला. परंतु त्यामुळें जपानच्या पूर्वीच्या स्थितींत किंचित्‌देखील फरक झाला नाहीं. बालबादशहा गादी-

वर, बालशोगन नांवाचे राज्यसूत्रचालक, परंतु होजो प्रतिनिधींच्या हातांत खरी सत्ता. हा क्रम जसा पूर्वी तसाच पुढेंही बरेच दिवस चालूं राहिला. अशा स्थितींतच गो डेगो नांवाचा बादशहा गादीवर बसला. हा जरी डामडौली व चैनी होता तरी आपल्या देशाची स्थिति याच्या पूर्णपणें लक्षांत आली होती. याचे कारकीर्दीत एक दुष्काळ पडला. त्यावेळीं त्यानें गरीब प्रजेस उत्तम प्रकारची मदत केल्यावरून तो फार लोकप्रिय झाला होता. आपणच खरे सत्ताधीश आहों अशी समजूत त्यास असल्यामुळें होजो प्रतिनिधींच्या अरेरावीपणाचा त्यास त्रास आला होता; व त्यांच्या जाचापासून मुक्त होण्याचा प्रयत्नही त्यानें कांहीं प्रबल मठाधिकाऱ्यांच्या साहाय्यानें केला होता. पण त्यास अपयश आलें व शेवटीं हद्दपारदेखील व्हावें लागलें. तरी यानें आपला प्रयत्न सोडला नाहीं. शेवटीं नित्त योषिसाद व कुसुनोकी मासशिगे ह्या दोन प्रामाणिक व राजनिष्ठ सरदारांच्या साहाय्यानें कामाकुरावर चाल करून तें शहर जाळून टाकून होजो प्रतिनिधीचा पूर्ण मोड केला व इ० स० १३३३ मध्यें पुनः राज्यपद मिळविलें. येणेंप्रमाणें होजो घराणें, १३९ वर्षें जपानावर सत्ता चालविल्यानंतर, नामशेष झालें. या घराण्यांतील जहागिरी गो डेगोनें जप्त करून आपल्या मर्जीतील मनुष्यांस वाटून दिल्या. आषिकागा घराण्यांतील ताकाउजी यास यावेळीं फार मोठी जहागीर मिळून तो प्रसिद्धीस आला. कांहीं कालानंतर ताकाउजी हा नित्त योषिसाद याचा मत्सर करूं लागला. नित्त हा राजद्रोही आहे असें त्यानें बादशहास सांगितलें. परंतु नित्त यानें आपण राजनिष्ठ असल्याचें सिद्ध केलें व राजाज्ञेवरून ताकाउजी यास शासन करण्यास निघाला. दोनही पक्षांमध्यें बऱ्याच लढाया झाल्यावर नित्त बादशहासह पळून गेला. गो डेगो पळून गेला म्हणून ताकाउजीनें दुसरा बादशहा गादीवर बसविला. नित्त व कुसुनोकी यांनीं पुनः गो डेगोचा पक्ष उचलला; परंतु त्यांचा पराभव होऊन दोघांनींही आत्महत्या केल्या. या प्रमाणें जय मिळविल्यानंतर आषिकागा ताकाउजी हा शोगन झाला. यानें गादीवर बसविलेल्या नवीन बादशहाच्या पांच वंशजांनीं

इ. स. १३९२ पर्यंत राज्य केल्यावर पुन्हा गो डेगोचे वंशजास राज्य मिळालें.

आषिकागा ताकाउजी इ. स. १३९८ मध्यें मरण पावल्यावर त्याच घराण्यांतील त्याचेमागून झालेले शोगन मागील इतर घराण्यांतील शोगनांप्रमाणेंच हळू हळू दुर्बल होत चालले. त्यांच्यापैकीं कांहीं शिल्प कलेंत सुधारणा करून तिला उत्तेजन देणारे होते. किनकाकु ( सुवर्णमंदिर ) व जिनकाकु ( रौप्यमंदिर ) हे दोन राजवाडे क्योटो येथें यांच्याचपैकीं दोघा शोगनांनीं बांधून नंतर त्यांचा मठासारखा उपयोग व्हावा म्हणून बौद्धधर्मीय मठाधिपतीस ते नजर करण्यांत आले. यांचेवेळीं सयाम देशाशीं प्रथमच जनावरांचा व्यापार सुरू झाला. नंतर एक वसाहत वसविण्यांत आली व पुढें कांहीं दिवसांनीं सयामच्या मदतीस म्हणून एक सैन्याची तुकडीहि ठेवण्यांत आली. चीन व कोरिया या दोनही देशांतील चांचे लोक जपानच्या व्यापारी जहाजांस त्रास देत म्हणून त्यांचा बंदोबस्त करण्यांत आला. पोर्तुगीज मिशनरी व व्यापारी यांनीं यांच्या सत्तेच्या ऱ्हास होण्याचे वेळींच जपानांत शिरकाव करून घेतला. यांची सत्ता जशी जशी संपुष्टांत येऊं लागली तशी तशी दूरदूरच्या प्रांतांवर पाठविलेल्या सुभेदारांस आपल्यापेक्षां कमजोर सुभेदारांच्या प्रांतांवर स्वाऱ्या करून आपला मुलुख वाढविण्यास चांगलीच संधी सांपडली. ह्या लढाया करण्याकरितां प्रत्येक सुभेदारास अथवा जहागिरदारास पुष्कळ सैन्य ठेवावें लागे. हें सैन्य पोसण्यास जहागिरदारास ऐपत नसल्यामुळें त्यास शेतकरी लोकांपासून जमिनींतील उत्पन्नाचा बराच भाग जबरीनें घ्यावा लागे. आपलें उत्पन्न आपणास मिळेल असा भरवसा नसल्याकारणानें शेतकरी लोक कमी श्रम करूं लागले. या कारणांनीं सर्व देश ओसाड झाला व प्रजाही फार दरिद्री झाली. असें सांगतात कीं, इ. स. १५०० या वर्षी जपानचा बादशहा गो सुचिमिकाडो मरण पावल्यावर त्याच्या उत्तर कार्यास लागणारा पैसा न मिळाल्यामुळे त्याचे प्रेत ४० दिवसपर्यंत तसेंच ठेविलें होतें. बाद-

शहाची जर ही स्थिति तर प्रजेची स्थिति कोणच्या प्रकारची असेल याची वाचकांनीं कल्पना करावी. अशी स्थिति कोणत्याही देशाची कधींहि झाली नसेल.

आषिकागा घराण्याचा उर्जितकाल संपून सुमारें १६ व्या शतकाच्या द्वितीयार्धाचे प्रारंभास त्यास विपदावस्था प्राप्त झाली. शेवटीं इ. स. १५७३ मध्यें या घराण्यांतील शेवटच्या पुरुषास नोबुनाग यानें पदच्युत केलें. ह्या घराण्याचें वर्चस्व इ. स. १३३३ पासून १५७३ पर्यंत ह्मणजे सुमारें २४० वर्षे राहिलें.

नोबुनाग हा जपानच्या सुप्रसिद्ध वीरांपैकीं एक महावीर होय. टैरा घराण्याशीं याचा बराच लांबचा संबंध होता ह्मणून हा आपणास टैरा-कुलोद्भव असें ह्मणवीत असे. " बळी तो कान पिळी " ह्या त्या वेळच्या न्यायपद्धतीस अनुसरूनच ह्याच्या बापानें ओवारी प्रांतांत कांहीं मुलुख मिळविला होता. ह्या मार्गाचेंच अवलंबन करून नोबुनाग हा पुढें ह्मणजे १५६० चे सुमारास त्याच प्रांतांचा जहागीरदार बनला व त्यानें एक किल्लाही बांधला. ह्याच्या अनेक आश्रितांमध्यें हिडेयोषी नांवाचा पुढें अतिप्रख्यातीस आलेला महाप्रतापी योद्धा होता. ह्याच्या साहाय्यानें नोबुनागानें शेजारच्या जहागीरदाराशीं, कांहींतरी कुरापती काढून, लढाया केल्या व अशा रीतीनें आपला मुलुख व सत्ता हीं अतोनात वाढविलीं. मागें योरिटोमोनें जसें सर्व देशावर आपलें वर्चस्व स्थापन केलें होतें त्याचप्रमाणें सर्व देश जिंकून आपला दरारा बसवावयाचा व नंतर सुनियंत्रित राज्यव्यवस्था जपानांत चालू करावयाची असा यांचा बेत होता.

लवकरच आषिकागा घराण्यांतील शोगनपदाभिलाषी दोन पुरुषांमध्यें स्पर्धा उत्पन्न झाली व एकानें नोबुनाग याची मदत मागितली. आपली देशदिग्विजयाची इच्छा सिद्धीस नेण्यास अशाच प्रकारचा एकादा मनुष्य आपल्या हातांशीं पाहिजे असें जाणून त्यानें त्यास मदत केली व त्यास शोगनपद प्राप्त करून दिलें. ह्या प्रसंगीं क्योटो येथें असतांना

त्यास ' फुकु शोगन ' ( उप पेशवा ) ही पदवी बादशहानें दिली. क्योटो शहराची वारंवार शत्रूंचे हल्ले आल्यामुळें, अग्निनारायणाचे अवकृपेमुळें व विशेषतः लोकांच्या दारिद्र्यामुळें झालेली शोचनीय स्थिति पाहून त्यास फार वाईट वाटलें व त्यानें लागलींच त्या शहरांतील बादशहांचे व शोगनांचे वाडे, देवळें, रस्ते, बागबगीचे आणि पूल वगैरे दुरुस्त करण्यास हुकूम दिला व गतवैभव पुनः प्राप्त झाल्यामुळें तें शहर पूर्वीप्रमाणें सुंदर व रमणीय दिसूं लागलें. ह्यानंतर १५७०–७१ मध्यें यानें कांहीं प्रसिद्ध व प्रबळ जहागीरदारांशीं युद्ध करून त्यांस शरण यावयास लाविलें; व इ० स० १५७३ मध्यें आषिकागा शोगनास पदच्युत करून आपण त्याचें काम पाहूं लागला. परंतु त्यानें शोगन ही पदवी मात्र धारण केली नाहीं. पूर्वीं टैरा व मिनामोटो या दोन घराण्यांमध्यें वैर असल्यामुळें मिनामोटो योरिटोमो याच्या वंशजांनीं धारण केलेली पदवी आपण घेणें उचित नाहीं असें त्यास वाटलें, किंवा असें केल्यास मोठाल्या जहागीरदारांच्या द्वेषास आपण पात्र होऊं व ह्यामुळें सर्व देश जिंकण्याचे कामांत फार व्यत्यय येईल असें त्यास वाटलें, हें सांगणें अशक्य आहे. ह्या पदवीच्या अभावीं बादशहानें त्यास नायब दिवाण ह्या अर्थाचा किताब दिला. नंतर नोबुनागाची वक्रदृष्टि चोशूच्या अत्यंत बलिष्ठ जहागिरदाराकडे वळली व त्याचें पारिपत्य करण्याकडे अर्थात् हिडेयोषीची योजना झाली. ही मोहीम सारखी चार वर्षें चालू राहिली तरी कार्यसिद्धि होईना. तेव्हां अतिशय कडक उपायांची योजना करणें त्यास भाग पडलें. परंतु असें करणें कदाचित् नोबुनाग यास पसंत पडणार नाहीं अशी शंका येऊन त्यानें त्यास युद्धभूमीवर स्वतः येऊन जाण्याविषयीं लिहिलें. ह्यावरून इ० स० १५८२ मध्यें तो चोशूकडे जात असतां वाटेंत त्यास अकेची मित्सुहिडे नामक त्याच्याच एका सेनापतीनें विश्वासघातानें ठार मारलें व अशा रीतीनें आपली एके प्रसंगीं अपमानकारक थट्टा केल्याबद्दल निर्दयपणानें सूड उगवला.

ह्या त्याच्या आकस्मिक, शोचनीय व अकालिक ( मरणसमयीं ह्याचें वय फक्त ४९ वर्षांचें होतें ) मृत्यूनें जपानचें अतोनात नुकसान झालें. हा शरीरानें साधारण उंच, कृश व नाजूक असा असून याचा चेहरा कांहींसा भव्य व उग्र दिसत असे. हा फारच रागीट परंतु निष्कपटी असून निश्चयी व शूर होता; तरीपण हा कोणतेंही अविचाराचें साहस-कृत्य करून आपलें शौर्य प्रकट करीत नसे. याचा स्वभाव व त्यास मिळालेलें उत्कृष्ट लष्करी शिक्षण हीं दोनही सेनानायकत्वास योग्य अशींच होतीं. त्यानें ज्या ज्या लढाया केल्या त्यांमध्यें त्यास यशच येत गेलें. हा जसा शूर होता तसा कारस्थानी नव्हता, ह्मणून त्यानें ज्या सुधारणा केल्या त्या फारशा चिरस्थायी झाल्या नाहींत; व अकालीं मृत्युमुखीं पडल्यामुळें देशांतील तंटेबखेडे मोडून सर्व देशभर शांतता राखावयाची व दरिद्री प्रजेस सुसंपन्न करावयाचें ही त्याची इच्छा सफल झाली नाहीं. आषिकागा घराण्याच्या दौर्बल्यावस्थेंत बौद्धधर्मीय भिक्षुलोकांस बरेंच प्राबल्य व याच कारणानें, राजकीय महत्त्वही प्राप्त झालें होतें. ह्या प्राबल्याचा उपयोग त्यांनी नोबुनागाच्या शत्रूस आणीबाणीच्या वेळीं मदत करण्याकडे केल्यावरून कांहींसा चिडून जाऊन त्यानें तद्धर्मीय लोकांचा छळ केला व पुढें त्यांच्याविषयीं त्याचे मनांत नेहमीं तिरस्कारबुद्धि वास करीत असे. एवढेंच करून तो थांबला असता तरी चांगलें झालें असतें. परंतु तसें न करितां उलट त्याच्या बाल्यावस्थेंतच ज्याचें बीजा-रोपण होऊन त्याच्या भर उमेदींत जो एक लहानसा पण जोमदार रोपा बनला होता त्या ख्रिस्तीधर्मरूपी बालवृक्षास आश्रयरूपी जल घालून त्याचा त्यानें अल्पकाळांतच एक प्रचंड वृक्ष बनविला व त्याच्या धर्म मंदिरें व प्रेष्यगणमठरूपी शाखा सर्व देशभर पसरविण्यास उत्तेजन देऊन तो धर्मवृक्ष इतक्या भरभराटीस आणला कीं, त्याच्यायोगानें केवळ बौद्धधर्माचाच नव्हे तर जपानच्या राष्ट्राचादेखील विनाश होतो कीं काय अशी याच्या नंतरच्या सुज्ञ मुत्सद्यांस भीति वाटत होती. ही एकच गोष्ट त्याच्या हेकेखोर स्वभावाची, अदूरदर्शित्वाची व राजनीतिचा-तुर्याच्या अभावाची साक्ष पटविण्यास पुरेशी आहे. ही एक गोष्ट खेरीज-

फिरून त्यानें केलेली कामगिरी राष्ट्राच्या हिताच्या दृष्टीनें पाहिली असतां फार महत्त्वाची आहे व ह्मणूनच त्यास जपानच्या प्रसिद्ध पुरुषांच्या मालिकेंत बसविणें भाग आहे. आषिकागा शोगन निर्बळ झाल्यावर राज्यामध्यें बेबंदशाही माजून राज्य लयास जाण्याची वेळ आली होती. अशा वेळीं मोठ्या नेटानें व हिमतीनें राज्यसूत्रें आपल्या हातांत घेऊन त्यानें राष्ट्राचा बचाव केला ही गोष्ट लक्षांत बाळगली पाहिजे. समयविशेषीं हा आपल्या हाताखालच्या अधिकाऱ्यांशीं फार उद्दामपणानें वागे; व हा इतका थट्टेखोर होता कीं त्यानें केलेला विनोद त्यांस सहन न होतां अपमानास मात्र कारणीभूत होई. ह्या त्याच्या स्वभाववैचित्र्यामुळेंच शेवटीं त्याचा नाश झाला.

हिडेयोषी हा यावेळीं चोशु प्रांतांत एक किल्ला घेण्याचें कामांत गुंतला होता. त्यास नोबुनागाच्या मरणाची बातमी समजल्यावर थोड्याच अवकाशांत त्यानें तो किल्ला सर केला व क्योटोकडे जावयास निघाला. वाटेनें जातांना त्यास मारेकऱ्यांची एक टोळी भेटली. त्याच्या बरोबरचे शिपाई बरेच मागें राहिल्यामुळें त्यांची मदत मिळण्याचा संभव नव्हता. तेव्हां आपला घोडा आडरानांतून व साळींच्या शेतांतून भरधांव फेंकून बरेंच अंतर चालून गेल्यावर तो त्यावरून उतरला व आपल्या तरवारीनें त्यास घायाळ करून ज्या दिशेनें तो आला होता त्याच दिशेकडे त्याचें तोंड फिरवून त्यास पिटाळून लाविलें. असह्य वेदनांमुळें बेफाम होऊन तो घोडा अत्यंत वेगानें पळत चालल्याकारणानें मारेकऱ्यांची वाटेंत बरीच त्रेधा उडाली. ह्या अवकाशांत हिडेयोषी जवळच्या मठांत गेला व आपण कोण आहों हें तेथें स्नान करीत असलेल्या भिक्षूंस सांगून आपणही नग्न होऊन त्यांच्याबरोबर एका मोठ्या कुंडांत पोहूं लागला. इतक्यांत मारेकरीही तेथें येऊन पोहोंचले व पाहतात तों तेथें सर्व नग्न भिक्षु पोहत आहेत असें त्यांस दिसलें व हिडेयोषीच्या शोधार्थ ते दुसरीकडे निघून गेले. मागून त्याचे शिपाई तेथें आले व आपला धनी तेथें आहे कीं काय हें बारकाईनें पाहूं लागले; तेव्हां तो भिक्षुवेष

धारण करून बसला आहे असें त्यांस आढळलें. ही गोष्ट त्याच्या विलक्षण प्रसंगावधानाचें उत्कृष्ट द्योतक आहे.

क्योटो येथें आल्यानंतर पहिल्यानें नोबुनागाचा वध करणाऱ्या अकेची नांवाच्या सेनापतीशीं युद्ध करून त्याचा पराभव केला व शेवटीं निराश होऊन त्या सेनापतीनें आत्महत्या केली. नंतर शोगन कोणास नेमावें याविषयीं उपस्थित झालेल्या भानगडींत त्यानें आपलें मन घातलें. नोबुनागाचा औरस पुत्र मरण पावल्यामुळें त्याचा नातू सांबोषी व दोन दासीपुत्र हे तिघे शोगनकीवर हक्क सांगूं लागले. ह्या तिघांसही चांगलेंच पाठबळ मिळाल्यामुळें देशांत तीन पक्ष उत्पन्न झाले. सांबोषीचा पक्ष स्वतः हिडेयोषीनें उचलला व सैन्याच्या जोरावर आपल्या पक्षाचें समर्थन करून त्यास शोगन नेमलें. दुसऱ्या दोनही पक्षांनीं कांहीं वेळ पड घेतल्यासारखें दाखविलें; परंतु आपल्या पक्षास जय आला तर आपल्यास फार मोठा अधिकार व पुष्कळ मुलुख बक्षीस मिळेल या आशेनें हिडेयोषीशीं युद्ध करून यश संपादन करण्याचा प्रयत्न केला. एका दासीपुत्राचा कैवारी शिबाता हा होता. याचा हिडेयोषीनें शिगुटेक येथें पराभव केला. ह्या लढाईत दारूगोळ्याचा उपयोग प्रथमच करण्यांत आला. या पराभवानंतर शिबाता यानें हाराकिरी ( आत्महत्या ) केली. दुसऱ्या दासीपुत्राची बाजू सुप्रसिद्ध ईयसू यानें घेतली होती. याच्याशीं लढण्याकरितां हिडेयोषीनें आपला एक सेनापति पाठविला होता. या लढाईत ईयसूचा जय झाला. परंतु हिडेयोषीपुढें आपला फार वेळ विभाव लागणार नाहीं असें पाहून व मिळविलेल्या जयांतच समाधान मानून ईयसूनें त्याच्याशीं तह केला व सांबोषीस शोगन कबूल केलें. या कामगिरीबद्दल हिडेयोषी यास बादशहानें ‘ कंबाकु ’ अशी अत्यंत उच्च पदवी दिली. ही मानाची पदवी डेजिन अथवा शोगन यांच्या वरच्या प्रतीची होती व फुजिवारा घराण्यांतील प्रसिद्ध पुरुषांसच ती ह्यावेळपर्यंत मिळालेली होती; व हिडेयोषीच्या वंशाखेरीज ती इतरांस मिळाली नाहीं. शेवटीं इ० स० १८६८ सालीं ती रद्द करण्यांत आली. असो.

इ० स० १५८३ पासून १५८७ पर्यंत देशांत बरीच शांतता होती. या अवकाशांत हिडेयोशीनें ओसाका येथें एक प्रचंड किल्ला बांधला व आपणही तेथेंच राहूं लागला. परंतु लवकरच त्याला लढाईची तयारी करणें भाग पडलें. क्यूशु बेटांतील सत्सुम प्रांताच्या जहागिरदारानें आपल्या शेजारच्या प्रांतावर स्वाऱ्या करून आठ प्रांत हस्तगत केले. तेव्हां भयभीत होऊन इतर जहागिरदारांनीं हिडेयोशीची मदत मागितल्यावरून ती त्यास देण्याचें त्यानें कबूल केलें. परंतु युद्ध करण्याचे पूर्वी त्यानें सत्सुमच्या जहागिरदाराकडे आपला वकील पाठवून त्याचेबरोबर 'आपण क्योटो येथें येऊन आपल्या ताब्यांत असलेल्या मुलखाबद्दल बादशाही सनद मिळवावी' अशा अर्थाचें पत्र दिलें. ह्याचा राग येऊन त्यानें त्या वकीलाचा फार अपमान केला व त्यानें आणलेलें पत्र फाडून पायांखालीं तुडविलें व हिडेयोशीसारख्या नीच कुळांतील मनुष्यास मी कधींही निष्ठा दाखविणार नाहीं असें सांगून त्यास निरोप दिला. हिडेयोशीनें अर्थात् सत्सुमाच्या जहागिरदारावर स्वारी केली व अनेक संग्राम झाल्यानंतर त्यास शरण आणिलें. यानें हातीं घेतलेल्या अनेक अतिप्रसिद्ध मोहिमांपैकीं ही एक मोहीम होय. यानंतर त्यानें ओदवारा येथील जहागिरदार शिरजोर झाला होता त्यास पराजित केलें. ह्यावेळींही एक विलक्षण गोष्ट घडली ती लक्षांत ठेवण्याजोगी आहे. हा ज्यावेळीं लढाईस निघाला त्यावेळीं समुद्रांत नेहमीं वादळें होत. तथापि सैन्य व घोडे समुद्रांतून पलीकडे नेणें अवश्य होतें; व नावाडी लोक धर्मवेडे असल्यामुळें घोडे नौकांतून पैलतीरास नेण्याचें कबूल करीनात; कारण त्यांची अशी समजूत होती कीं घोडे नावेंत घेऊन पर्यटन केल्यानें न्यूगू ( समुद्रदेव, वरुण ) फार क्रुद्ध होतो व ह्यामुळें अपघात होतात. हिडेयोशीनें त्या नाविकांस बोलावून आणिलें व मोठ्या गंभीरतेनें त्यांस सांगितलें कीं मी बादशहाच्या हुकुमावरून ही मोहीम करीत आहे व अशा कामास लागणारें सैन्य व घोडे या किनाऱ्यावरून त्या किनाऱ्यावर नेण्यास हरकत करील इतका कांहीं न्यूगू असमंजस व असभ्य नाहीं. तथापि न्यूगूस एक पत्र लिहून जहाजांच्या जाण्यायेण्यास हरकत होणार

नाहीं असा बंदोबस्त करवितों ह्मणजे झालें. नंतर शांतपणें त्यानें एक पत्र लिहिलें व त्यावर ' न्यूगू यास ' अशीं अक्षरें लिहून तें समुद्रांत फेंकिलें. ह्या गोष्टीनें त्यांस समाधान वाटलें व त्यांनीं सर्व सैन्य बिन-तक्रार पैलतीरास नेऊन पोहोंचविलें. ह्यावेळीं समुद्रांत तुफान वगैरे कांहीं एक झालें नाहीं हें सांगणें नकोच. वेडगळ धर्मकल्पना त्याच्या मनास शिवतदेखील नव्हत्या हें वरील गोष्टीवरून व्यक्त होतें. नोबु-नागाची देशदिग्विजयाची इच्छा हिडेयोषीनें ह्या स्वारीनें शेवटास नेली असें ह्मणण्यास हरकत नाहीं.

ह्याप्रमाणें देशांत सर्वत्र शांतता केल्यावर त्याचें लक्ष कोरियाकडे लागलें. ह्या देशावर स्वारी करण्याचा त्याचा नोबुनागाचे वेळेपासून विचार होता. नोबूनाग मेल्यानंतर लागलींच ह्मणजे इ. स. १५८२ मध्यें यानें एक वकील कोरियामध्यें पाठविला व बंद केलेली खंडणी पुनः चालूं करण्याविषयीं बोलणें सुरूं झालें; परंतु कोरियाचा राजा तें कबूल करीना. नंतर ह्यानें त्सुषिमामा जहागिरदार पुनः तीच गोष्ट साध्य करून घेण्याकरितां पाठविला व शेवटीं हो ना करितां करितां कोरियांतील वकीलमंडळ हिडेयोषीकडे आलें. ह्यांस त्यानें अत्यंत अपमानकारक रीतीनें वागविलें व कोरियाच्या राजानें दिलेल्या पत्रास उद्दामपणाचें उत्तर देऊन व कोरियावर स्वारी करण्याचा आपला निश्चय निवेदन करून त्या वकील मंडळास त्यानें अतिशय तिरस्कारानें निरोप दिला. नंतर युद्धाची कडेकोट तयारी करून दोन सेनापतींच्या अधिपत्याखालीं मोठें सैन्य कोरियांत पाठविलें. या युद्धाचें वर्णन पुढें ' कोरिया व जपान ' या प्रकरणांत दिलें आहे. जपानी सैन्यास जरी मोठाले जय मिळाले तरी एकंदरींत या युद्धाचा परिणाम जपानास फारसा समाधानकारक, हितकारक व अभिमानास्पद झाला नाहीं.

कोरियामध्यें युद्ध चालू असतांनाच हिडेयोषीची प्रकृति बिघडत चालली होती व आपण आतां फार दिवस वांचणार नाहीं असें त्यास कळून आल्याबरोबर त्यानें आपल्या वंशजांच्या हातीं राज्यसत्ता रहावी

ह्मणून व्यवस्था करण्यास आरंभ केला. प्रथम आपल्या मुलाच्या बाल्यावस्थेंत राज्यकारभार पाहण्यासाठीं त्यानें एक प्रतिनिधिमंडळ नेमून ईयासू यास ह्या मंडळाचा अध्यक्ष व मुलाचा पालक नेमिलें. ह्या मंडळास साह्य करण्यासाठीं एक सचिवसभा व एक सेनानीसभा अशा दोन संस्था स्थापन केल्या. शेवटीं मरणसमयीं वरील तीनही संस्थांच्या प्रत्येक सभासदाकडून आपल्या अज्ञान व अल्पवयी मुलास सदैव निष्ठा दाखविण्याविषयीं शपथ घेववून व ईयासूस त्याचा उत्तम प्रकारें प्रतिपाल करण्यास सांगून हा जपानचा परम विख्यात व पराक्रमशाली वीर इ० स० १५९८ मध्यें आपल्या वयाच्या ६२ व्या वर्षीं मरण पावला. यानें १५९० मध्यें ' कंबाकु ' ह्या पदाचा त्याग करून तें आपल्या पुतण्यास देवविलें व आपण टेकोसामा ही पदवी धारण केली व याच नांवानें तो इतिहासामध्यें प्रसिद्ध आहे.

टेकोसामा हा शरीरानें साधारण उंच व कृश असून स्वभावानें शांत, निष्कपटी व थोडा अभिमानी असा होता. प्रारंभीं नोबुनागाच्या सैन्यामध्यें चाकरीस राहून आपल्या अंगच्या हुशारीनें व कर्तबगारीनें तो इ० स० १५६० मध्यें ह्मणजे आपल्या वयाच्या २४ व्या वर्षीं सेनानायक बनला. यांच्या अंगच्या शौर्य, चातुर्य कल्पकता, दूरदर्शीपणा इत्यादि गुणांवर लुब्ध होऊन नोबुनागानें यास सेनाधिपति केलें व त्याची सर्व भिस्त याच्यावरच असे. इ० स० १५९० पर्यंत ( ह्मणजे सुमारें ३० वर्षांपेक्षां जास्त काळपर्यंत ) यास अनेक युद्धप्रसंग आल्यामुळें उत्कृष्ट सेनानीस लागणारे सर्व गुण ह्याच्या अंगीं प्रकर्षेंकरून संचार करीत असत. शत्रूंकडे आपले हेर पाठवून त्यांचें बलाबल पाहणें, प्रसंगोचित व्यूहरचना करणें, कपटप्रयोग करून शत्रूंस फसविणें, बिकट प्रसंगीं सैन्यास प्रोत्साहन व धीर देणें व लढाई मारल्यानंतर सैन्यास बिघडूं न देतां त्यास कह्यांत ठेवून लागलींच पुढल्या स्वारीची तयारी करणें इत्यादि कामांत ह्याचा हातखंडा असे. याला ईयासूसारख्या शूर व कारस्थानी पुरुषाची मदत मिळाल्यामुळें ह्याच्या वाट्यास अपयश

कधींच आलें नाहीं. हा किती प्रसंगावधानी असे हें वर दिलेल्या एक दोन गोष्टींवरून सहज दिसून येईल. याला वाचनाचाही बराच नाद असे. हा जितका युद्धकलानिपुण होता तितकाच राज्यव्यवहारदक्ष नव्हता. यानें केलेल्या सुधारणा ह्याच्यामागें फार दिवस राहिल्या नाहींत. हा फारच महत्वाकांक्षी होता. असें ह्मणतात कीं, नोबुनागाशीं संभाषण चाललें असतांना तो असें बोलला कीं क्यूशु बेट काबीज केल्यावर मी कोरियावर स्वारी करीन व कोरिया हस्तगत झाल्यावर चीनदेशही जपानच्या अमलाखालीं आणीन. ह्यावरून त्यानें कोरियावर स्वारी कां केली हें सहज लक्षांत येण्यासारखें आहे.

याचें सर्व आयुष्य तरवार गाजविण्यांत गेल्यामुळें धर्माचा संस्कार याच्या मनावर मुळींच झाला नव्हता असें ह्मटलें तरी हरकत नाहीं. स्वधर्माविषयीं तो उदासीन होता ऐवढेंच नाहीं तर नोबुनागाप्रमाणेंच प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष रीतीनें यानें ख्रिस्तधिर्म प्रसारास प्रथम प्रोत्साहन दिलें. परंतु एका पोर्चुगीज कप्तानाचें गैर सावधगिरीनें उच्चारलेलें 'माझा राजा प्रथम धर्मोपदेशक पाठवून लोकांस आपलेसे करितो व मागून त्यांचे मदतीस सैन्य पाठवून तो देश सहज जिंकून घेतो' हें वाक्य हेरांनीं त्यास कळविल्यावर तो सावध झाला व ख्रिस्ती धर्मोपदेशकांस देशांतून हाकून देण्याविषयीं हुकूम फरमाविला; व अशा रीतीनें देशावर ओढवणाऱ्या भावी संकटापासून देशाची मुक्तता करण्यास आरंभ केला. असो. या थोर व पराक्रमी पुरुषाचें नांव जपानच्या कोणत्याही काळीं लिहिलेल्या इतिहासांतून नाहींसें होणार नाहीं. हीन कुलांत जन्म घेऊनही समकालीन प्रतिपक्षांच्या विरोध मत्सरादिकांमुळें केलेल्या खोडसाळपणास व उपहासास न जुमानतां केवळ आपल्या अकलेच्या व शौर्याच्या जोरावर जपानसारख्या केवळ पिढीजादपणाचा अभिमान बाळगून उच्चपदावर हक्क स्थापन करूं इच्छिणाऱ्या लोकांच्या राष्ट्रांत (निदान त्या वेळीं तरी जपानांत अशी स्थिति होती) हिडेयोषी कंबाकूसारख्या अत्युच्च पदारूढ झाला ही गोष्ट त्या राष्ट्रास फारच भूषणावह आहे यांत शंका नाहीं.

टेको सामाच्या मागें त्याच्या इच्छेप्रमाणें तीन वर्षे व्यवस्था राहिली. परंतु नंतर लवकरच मत्सरामुळें मंत्रिमंडळामध्यें तंटे उपस्थित झाले व खरी सत्ता ईयासूच्या हातांत असल्यामुळें इतर नामधारी सचिव त्याचा द्वेष करूं लागले. हे सचिव बडे बडे प्रांताधिकारी अथवा जहागिरदारच होते व मित्सुनारी नांवाचा टेको सामाची खुशामत करून व लावालाव्या करून—युद्धचातुर्यानें नव्हे—पुढें आलेला मनुष्य त्यांचा पुढारी होता. ह्यानें ईयासूवर अनेक दोषारोप केले व तो दुराचरणी असून टेकोसामाच्या मुलाचें हिताहित न पाहतां आपणच सर्व सत्ता बळकाविण्याचें महत्पाप करीत आहे; अशा दुष्टास शासन करण्याकरितां मला मदत करावी असें जाहीरपत्रक आपल्या पक्षाच्या जहागिरदारांमध्यें फिरविलें. ह्यामुळें सव्वा लक्षावर सैन्य ओसाका येथें थोड्याच काळांत जमलें. ईयासु हा पहिल्या-पासून ख्रिस्ती लोकांच्या विरुद्ध असल्यामुळें बहुतेक सर्व दक्षिणेकडील ख्रिस्ती राजे त्याच्या विरुद्ध पक्षास मिळाले. ईयासूस प्रतिपक्षाची युद्धाची तयारी चालली आहे अशी गुणगुण कळतांच तो यदोकडे जाऊन लढाईची तयारी करीत होताच. त्यानेंही सुमारें पाऊण लाख सैन्य जम-विलें व क्योटोकडे यावयास निघाला. या दोनही सैन्यांची गाठ सेकीगहारा येथें इ. स. १६०० मध्यें पडली व घनघोर संग्राम झाल्यानंतर ईयासूला पूर्ण जय प्राप्त झाला. मागें टैरा व मिनामोटो या दोन घराण्यां-मध्यें जशी डान-नो-उरा येथें एक मोठी वर्चस्वनिर्णायक लढाई झाली तशीच हीदेखील झाली. विजय मिळाल्याबरोबर वेळ मुळींच न गमावतां क्योटो व ओसाका हीं शहरें त्यानें हस्तगत केलीं व आपली सत्ता सर्व देशभर पूर्णपणें स्थापन केली. यानंतर यानें दहा बारा वर्षे ख्रिस्ती धर्माचें निर्मूलन करण्यांत, नवीन तऱ्हेची जहागिरदारी पद्धति अमलांत आणण्यांत, राज्याचा बंदोबस्त करण्यांत व विद्याव्यासंगांत घालविलीं. यानें ह्या कालांत केलेल्या कामगिरीची सविस्तर हकीकत पुढें योग्य प्रकरणांत दिली असल्यामुळें येथें तिजविषयीं जास्त लिहिण्याचें कारण नाहीं.

इ. स. १६०३ मध्यें बादशहानें ईयासूस शोगन ही पदवी दिली होती. आपल्यादेखत आपल्या मुलाचें आधिपत्य स्थापन व्हावें ह्मणून इ. स. १६०५ मध्यें ती आपल्या मुलास देऊन आपण अधिकारभ्रष्ट होऊन संपू येथें जाऊन राहिला. तरी सर्व महत्वाचीं कामें ह्याच्या ह्मणण्याप्रमाणेंच होत असत. टैको सामाचा मुलगा अद्यापि जिवंत असल्यामुळें आपले प्रतिपक्षी त्यास मदत करून आपल्या मागें आपल्या वंशजांस पदच्युत करितील अशी यास शंका येऊं लागली होती. या भावी अनर्थाचा वेळींच प्रतिकार करण्याचा त्यानें निश्चय केला व इ. स. १६१६ मध्यें टैको सामाचा मुलगा व बायको ओसाकाच्या किल्ल्यांत रहात होतीं त्या किल्ल्यावर हल्ला केला. फार मोठें निकराचें युद्ध झाल्यावर टैको सामाचा मुलगा व बायको मारली गेली आणि ईयासूचा जय झाला व त्याच्या इच्छेप्रमाणें जपानचीं राज्यसूत्रें इ. स. १८६८ पर्यंत त्याच्याच वंशजांचे हातांत राहिलीं. ही ईयसूनें केलेली शेवटची लढाई होय.

याप्रमाणें आपल्या इच्छेनुरूप सर्व व्यवस्था केल्यावर ईयासु हा इ. स. १६१६ मध्यें आपल्या वयाच्या ७४ व्या वर्षीं मरण पावला. हा शरीरानें मध्यम उंच आणि स्थूल असून स्वभावानें शांत, निश्चयी व दयाळू होता. टैको सामाप्रमाणेंच ह्यानेंही नोबुनागाच्या हाताखालीं अगदीं खालच्या दर्जाची नोकरी पत्करली होती व त्याच्याप्रमाणें हाहि स्वपराक्रमानें मोठ्या योग्यतेस चढला. हा मिनामोटो घराण्यांतील वंशज होता. परंतु टोकुगावा नांवाच्या गांवांत याचे पूर्वज रहात होते ह्मणून याचें नांव टोकुगावा ईयासु असें पडलें; व मरणानंतर यास गोंजेन सामा ( बुद्धाचा अवतार ) अशी पदवी देण्यांत आली. नोबुनागाच्या वेळेपासून तों ह्यास शोगनपद प्राप्त होईपर्यंत ह्मणजे १५६० पासून १६०३ पर्यंत व नंतर मरणाचे पूर्वी ह्यानें सेनाधिपत्य स्वीकारून ज्या ज्या लढाया केल्या त्या सर्वांमध्यें यास विजयश्रीनें माळ घातली. टैको सामाप्रमाणें याच्या अंगींहि प्रयोजकता, युक्तिबाहुल्य, समरकौशल्य,

कार्यक्षमता व धोरण इत्यादि गुण पूर्णत्वानें वास करीत होते. ' विजय मिळविल्यावर आपल्या शिरस्त्राणाचे बंद आवळून घट्ट बांधा ' या जपानी ह्मणीप्रमाणें अक्षरशः त्याचें वर्तन असे. शत्रूचा पराभव झाल्यावर त्यापासून आपलें हित कसें साधावें हें त्यास पूर्ण अवगत असे. तो जसा शूर तसाच राज्यनीतिज्ञहि होता; व ह्याच कारणानें त्यानें घालून दिलेली राज्यपद्धति त्याच्यामागें सुमारें अडीचशें वर्षे टिकली. शत्रुपक्षांतील जहागिरदारांच्या जहागिरी जेव्हां तो एकाद्या लढाईनंतर जप्त करी तेव्हां ते असंतुष्ट होतील अशा रीतीनें त्यांच्या मुलखाची व्यवस्था न करितां मोठ्या शांतपणानें व विचारानें तो त्याची वांटणी करी. नोबुनाग अथवा टैको सामा यांच्याप्रमाणें ह्यानें ख्रिस्तीधर्मास कधींच उत्तेजन दिलें नाहीं; व प्रथम जरी कार्यव्यापृतत्वामुळें त्या धर्माच्या भयंकर विस्ताराकडे यास आपलें लक्ष पुरवितां आलें नाहीं तरी वेळ सांपडल्यावर ह्यानें त्या धर्माच्या प्रसारास प्रतिबंधक असे कडक कायदे केले; व ह्याच मार्गाचें अवलंबन याच्या वंशजांनीं करून जपानांतून ख्रिस्तीधर्म बहुतेक नाहींसा करून टाकिला. हा फार विद्याव्यासंगी असे. राज्यकारभार आटोपून जो वेळ राही तो सर्व तो वाचनांत व लिहिण्यांत घालवी. ईयासूचा ' मृत्युलेख ' नांवाचा एक ग्रंथ सुप्रसिद्ध आहे. यामध्यें नीति, राज्यव्यवस्था, शिष्टाचार, धर्म, कायदे इत्यादि विषयांवर थोडक्यांत त्यानें आपले विचार प्रदर्शित केले असून आपल्या चरित्रांतील कांहीं गोष्टींचाही ठिकठिकाणीं उल्लेख केलेला आहे; व यामुळें तो ग्रंथ विशेष मनोरंजक झाला आहे. छापण्याची कला याचे वेळीं विशेष उर्जितावस्थेस आली. आपल्याप्रमाणेंच प्रजेमध्येंही विद्येची अभिरुचि उत्पन्न व्हावी ह्मणून मोठमोठ्या ठिकाणीं यानें शाळा घालविल्या व शारीरिक आणि लष्करी शिक्षणाबरोबरच मानसिक शिक्षण प्रजेस मिळण्याची व्यवस्था केली. याप्रमाणें यानें जपानांत आपलें नांव अजरामर करून ठेविलें आहे.

नोबुनाग, टैको सामा व गोंजेन सामा या तीन १६ व्या शतकाच्या द्वितीयार्धांतील प्रसिद्ध पुरुषांची पाश्चात्य पद्धतीप्रमाणें परस्पराशीं तुलना

करणें फार मनोरंजक होईल. परंतु विस्तारभयास्तव तें काम येथें करितां येत नाहीं. हे तीन पुरुष ह्मणजे एका साखळीच्या तीन कड्या होत. नोबुनाग जसा टैको सामाच्या अभ्युदयास कारण झाला तसा टैको सामाही गोंजेन सामाच्या उत्कर्षास कारणीभूत झाला, आणि राज्यांतील कलह मोडून व एकसत्ताक राज्य करून देशांत शांतता करावयाची हा जो नोबुनागाचा मनोरथ होता तो वरील दोन्ही सामांनीं शेवटास नेला. तिघेही पुरुष फार पराक्रमी होते व तिघांनींही निरनिराळ्या वेळीं कांहीं कालपर्यंत राज्यसूत्रें हातीं घेतलीं होतीं. तथापि विशिष्ट गुणांवरून त्यांची योग्यता ठरवावयाची असल्यास तिघांमध्यें टैको सामा युद्धचातुर्यांत श्रेष्ठ होता व गोंजेन सामा हा मुत्सद्दीपणांत श्रेष्ठ होता असें ह्मटलें पाहिजे.

टोकुगावा वंशांत गोंजेन सामाच्या मागून जे पुरुष शोगन झाले त्यांमध्यें त्याचा नातू बराच प्रसिद्ध आहे. बाकीचे पुरुष नामधारी शोगन असून खरा राज्यकारभार त्यांच्या हाताखालचे अधिकारी पहात असत. त्यांच्या अमदानींत सर्वत्र शांतता नांदत असल्यामुळें शेतकी, व्यापारधंदे, कलाकौशल्य, विद्या व अनेक शास्त्रें यांस चांगलें उत्तेजन मिळाल्याकारणानें देशाची भरभराट होऊन जपानास पुन्हा गत-वैभव प्राप्त झालें.

याप्रमाणें इ. स. ६६८ मध्यें टेंजी बादशहा गादीवर बसल्यापासून तो १८६८ मध्यें सध्याचा बादशहा मुत्सुहितो राज्य करूं लागेपर्यंत ह्मणजे सुमारें १२०० वर्षेंपर्यंत जपान देशाची खरी सत्ता कांहीं विशिष्ट घराण्यांतील पुरुषांच्या अथवा त्यांच्या प्रतिनिधींच्या हातांत होती. या कालापैकीं सरासरी सव्वापांचशें वर्षें फुजिवारा व टैरा घराण्यांतलि पुरुषांनीं मुख्य प्रधान ह्मणून बादशहांच्या नांवानें राज्यकारभार चालविला, व यानंतर सेनापतींनीं प्रधानांचा अधिकार बळकावून, एका घराण्याच्या मागून दुसऱ्या बलिष्ठ घराण्यानें, या क्रमानें, सुमारें पावणेसातशें वर्षें बादशहाचे प्रति-निधि ह्मणून राज्य केलें. हा काल जपानच्या मर्दुमकीचा होता यांत

संशय नाहीं. तथापि त्या कालांत कर्तव्यदक्षता, न्यायबुद्धि, स्वदेशप्रीति व स्वार्थत्याग इत्यादि राष्ट्राच्या उत्कर्षास अवश्य असणाऱ्या उदात्त गुणांचा बहुतेक अभावच दिसून येतो. बहुतेक सर्व प्रसिद्ध पुरुषांनीं आपल्या बुद्धिमत्तेचा व सामर्थ्याचा उपयोग आपआपसांत लढाया करून प्रांत बळकावण्यांत, देश उद्ध्वस्त करण्यांत व देशहितापेक्षां स्वार्थ साधण्यांतच केला. ही स्थिति शोगननें आपला अधिकार १८६८ सालीं बादशहाचे स्वाधीन करीपर्यंत चालूं होती. ह्या वर्षापासून जपानच्या जागृतीच्या कालास आरंभ झाला. ह्या कालास अनुलक्षून पाश्चात्य लोकांनीं जपानचें ‘ उद्धृत ’ अथवा ‘ प्रबुद्ध जपान ’ असें नांव ठेविलें आहे. जपानच्या अर्वाचीन कालाचा इतिहास देण्यापूर्वी पूर्वीच्या कालांतील दोन तीन महत्वाचीं उपकथानकें सविस्तर देणें जरूर आहे. ह्मणून तीं प्रथम देऊन नंतर जपानच्या आधुनिक कालाकडे वळूं.

# कोरिया आणि जपान.

४

कोरिया व जपान यांचा संबंध फार प्राचीन काळापासून चालत आलेला आहे. जपानचा पहिला बादशहा जिमू यानें कोरियांतून जपानवर स्वारी करून ख्रिस्ती शकापूर्वी ६६० या वर्षी राज्याची स्थापना केली. यानंतर दोन्ही राष्ट्रांमधील व्यवहार हळू हळू कमी होत चालला व कालांतरानें आपल्या मातृभूमीचा जपानी लोकांस विसरही पडला. तथापि कोरिया देशाचें नांव जपानांत ऐकूनही माहीत नव्हतें असें नाहीं. एका देवतेचा जिंगो राणीस साक्षात्कार होऊन तिनें त्या राणीस कोरियावर स्वारी करण्यास सांगितलें व ह्या वेळेपासून आपल्या पश्चिमेकडे एक देश आहे असें जपानी लोकांस कळलें अशी एक दंतकथा आहे, परंतु ती विश्वसनीय नाहीं. जपानच्या दक्षिणेस असलेलें क्यूशु बेट व कोरिया यांच्यामध्यें पूर्वीपासून दळणवळण होतें; व कोरियादेश सुसंपन्न आहे असें कळल्यावर जपानचा १४ वा बादशहा चुऐ यानें क्यूशु बेटांतच आपली राजधानी स्थापून तेथून कोरियावर स्वारी करण्याची उत्तम तयारी केली. परंतु स्वारीस निघण्याच्या पूर्वीच तो मरण पावला. तेव्हां त्याची बायको जिंगो कोगो हिनें आपल्या प्रधानाच्या साहाय्यानें त्या देशावर इ. स. २०२ मध्यें स्वारी केली. कोरियाचे यावेळीं कोरै, शिराकी व कुडारा असे तीन मोठे भाग असून प्रत्येक भागावर एक स्वतंत्र राजा राज्य करीत असे. कांहीं एक कारण नसतांना जिंगो राणीनें अगदीं अकल्पित केलेल्या स्वारीस प्रतिबंध करण्याची कोणत्याही राजाची तयारी नसल्याकारणानें ते तात्काळ राणीस शरण गेले व तिचे मांडलिक होण्याचें कबूल केलें. त्यांनीं लागलीच तिला मोठी रकम खंडणीदाखल दिली व वार्षिक खंडणी जपानांत पोहोंचविण्याचें आश्वासन दिलें. या अटी योग्य रीतीनें पाळल्या जाव्या म्हणून आपल्याबरोबर कांहीं

ओलीस घेऊन इ. स. २०४ मध्यें जपानांत परत आली. ह्या स्वारी-नंतर लागलीच कोरियांतील राज्यपद्धति जपानांत सुरू करण्यांत आली. पुढें ओजिन बादशहाचे वेळीं कुडाराच्या राजानें वार्षिक खंडणी बरोबर देऊन इ. स. २८४ मध्यें एक चिनीभाषाभिज्ञ असा वकील पाठविला त्यास ठेऊन घेऊन बादशहानें राजपुत्राकडून चिनी वाङ्मयाचा अभ्यास करविला. हें कुडाराच्या राजास कळतांच पुढील वर्षी त्यानें वानि नांवाचा एक प्रसिद्ध पंडित जपानांत पाठविला. ह्याचे हाताखालीं कांहीं वर्षे राहिल्यावर कान्फुशसच्या धर्मग्रंथांत व चिनी भाषेंत त्यानें बरेंच नैपुण्य संपादन केलें. ह्या वेळेपासून चिनी भाषेचें अध्ययन जपानांत सपाट्यानें सुरू झालें.

कोरिया व जपान यांचा संबंध ६ व्या शतकाच्या आरंभापर्यंत सुरळीत चालला होता; परंतु ६ व्या शतकाच्या प्रारंभीं कांहीं राजकारण उपस्थित झाल्यामुळें कैटै बादशहानें कोरियावर स्वारी केली आणि अशा तऱ्हेनें लढा मिटविला. पुढें ह्याच शतकाच्या मध्यभागीं कुडाराच्या नवीन राजानें आपल्या वकीलाबरोबर वार्षिक खंडणी, शाक्यमुनीची एक मूर्ति आणि कांहीं बौद्धधर्मग्रंथ पाठविले. त्यानें बादशहाजवळ बौद्धधर्माची फार तारीफ केली व त्याचीं उदात्त तत्वें बादशहाच्या मनावर ठसवून त्याच्या मनांत त्या धर्माविषयीं अनुकूल ग्रह उत्पन्न केला. त्या वेळच्या मुख्य प्रधानाच्या मनावरही बौद्धधर्मतत्वांचा सुसंस्कार झाला व बुद्धाच्या मूर्तीसाठीं त्यानें एक देऊळ बांधलें; व त्या मूर्तीची पूजा करण्याविषयीं त्यानें हुकूम केला. ही गोष्ट ओकोशी व कुमाको या दोघा सचिवांस आवडली नाहीं. याच वेळीं देशामध्यें रोगाची भयंकर साथ उत्पन्न झाली. ती वरील नवीन व विचित्र देवाच्या मूर्तीमुळें उत्पन्न झाली असें यांचें मत पडून ती समुद्रांत फेंकून देण्याविषयीं त्यांनीं बादशहास आग्रह केला. अर्थात् रोगनिवारणार्थ ती मूर्ति बादशहाच्या आज्ञेवरून समुद्रांत टाकून देण्यांत आली.

कोरियांतील कुडारा प्रांताचा नवीन राजा फार सुज्ञ, धार्मिक व बौद्ध-धर्माच्या प्रसारासाठीं परिश्रम करणारा होता. पहिला यत्न जरी निष्फळ

झाला तरी आपला निश्चय यानें सोडिला नाहीं. त्यानें इ. स. ५७२ त वार्षिक खंडणीबरोबर कांहीं बौद्धधर्माचीं पुस्तकें, रित्सुपंथाचा धर्माधिकारी, एक भिक्षु, एक परिव्राजिका, एक फलज्योतिषी, एक मूर्तिकार व देवळें बांधण्याकरितां एक शिल्पशास्त्री इतका परिवार जपानच्या बिटत्सु बादशहाकडे पाठविला. मुख्य प्रधान उमाको हा बौद्धधर्माभिमानी असल्यामुळें देशांत सिद्धायतनें, व विहारादिकांची संख्या त्वरेनें वाढत चालली. यावेळीं मोरिया नांवाचा एक शिंटोधर्माभिमानी मंत्री बौद्धधर्मप्रसारास अत्यंत विरुद्ध होता. पण लवकरच हा ठार मारला गेला व बौद्धधर्माचा उत्कर्ष होत चालला. पुढें सुइको राणीच्या वेळीं शोटोकु टैशी यानें त्या धर्माच्या प्रसारार्थ स्वतः फार मेहनत केली व राजाश्रय मिळाल्यामुळें तो धर्म थोडक्याच काळांत भरभराटीच्या शिखरास जाऊन पोहोंचला.

जपानच्या मानानें पाहिलें असतां चीन व कोरिया या दोन्ही देशांत त्या कालीं सुधारणेची परमावधि झाली होती. अर्थात् कोरियाच्या संसर्गानें जपानचें पाऊल प्रत्येक बाबतींत पुढें पडत चाललें. शेतकी व रेशीम उत्पन्न करण्याची जुनी रीत ह्यांच्यामध्यें बरीच सुधारणा झाली; प्राचीन कला व धंदे नांवारूपास येऊन पुष्कळ नवीन नवीन कला व धंदे देशांत सुरू झाले; व्यापार वाढला; चिनी भाषा व वाङ्मय यांचा अभ्यास प्राथमिक शाळांतून होऊं लागला; विश्वविद्यालयें स्थापन होऊन त्यांमधून चिनी भाषा, चीनचा इतिहास, भूगोल, गणित, फलज्योतिष, खज्योतिष, पंचांगरचनापद्धति, कानफुशसचीं तत्वें, वैद्यशास्त्राची नाडीपरीक्षा व पदार्थांचे गुणदोष यांचें ज्ञान इत्यादिकांचें शिक्षण देण्यांत येऊं लागलें व सर्व बाजूंनीं जपानचा उत्कर्ष होऊं लागला. अधिकारांचीं नांवें, बहुमानाच्या पदव्या व धर्माचार्यांच्या अधिकारसंज्ञा हीं सर्व चीन देशांतूनच घेतलीं आणि चिनी राज्यपद्धतीचादेखील स्वीकार करण्यांत आला. जपानच्या इतिहासाचीं साधनें मिळवून दोन ऐतिहासिक ग्रंथ लिहिण्यांत आले. चीन देशांतील लोकांच्या चालीरीतीचें अनुकरण करण्यांत आलें व जपान ह्मणजे चीनचें एक लहानसें प्रतिबिंबच बनलें.

जपानचा अतिप्राचीन धर्म ह्मटला ह्मणजे शिंटो हा होय. ह्या धर्माच्या देवतागणामध्यें सूर्य ही देवता श्रेष्ठ मानिली जात असून तिच्या उपासनेकरितां अनेक देवालयें बांधलेली आहेत. त्यांपैकीं इसे येथील देवालय मुख्य आहे. हा धर्म वीरभक्तिप्रधान आहे व या धर्मांत व इतर धर्मांत फरक असा आहे कीं या धर्मांत इतर धर्मांप्रमाणें कांहीं विशिष्ट मतें प्रतिपादन केलेलीं नाहींत किंवा मोठाले सिद्धांत स्थापन केलेले नाहींत. राजाश्रयामुळें बौद्धधर्माचा प्रसार झाल्यानंतर शिंटोधर्माचा उच्छेद न होतां दोन्ही धर्म बंधुत्वाच्या नात्यानें अद्यापपर्यंत जपानमध्यें नांदत आहेत.

कैटै बादशहानें कोरियावर स्वारी केल्यावर कुडारामध्यें जपानी सैन्याची एक तुकडी ठेवण्यांत आली होती. या तुकडीवर शिराकी प्रांताच्या सैन्यानें चीनची मदत घेऊन हल्ला केला व तिला जपानांत इ. स. ६७० मध्यें पिटाळून लाविलें. या अपमानाचा जपाननें प्रतिकार केल्याचें दिसून येत नाहीं. पुढें आषिकागा घराण्याच्या कारकीर्दींत कोरियावर जपाननें एक दोन किरकोळ स्वाऱ्या केल्या; तथापि त्या विशेष फलप्रद झाल्या नाहींत. उलट कांहीं वर्षांनंतर कोरियानें वार्षिक खंडणी पाठविण्याचें बंद केलें. हीच सबब पुढें करून हिडेयोषीनें कोरियावर स्वारी करण्याचा निश्चय केला. प्रथम सामोपचारानें कोरियास ताळ्यावर आणण्याकरितां इ. स. १५८२ त त्यानें एक वकील कोरियांत पाठविला; परंतु याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. पुन्हा थोड्याच दिवसांनीं सुषिमा बेटाच्या मुख्याधिकाऱ्यास वकील ह्मणून कोरियांत पाठविलें. त्यास उत्तर न देतां कोरियाच्या राजानें बरेच दिवस तिष्ठत ठेविलें व शेवटीं कांहीं महत्वाचे ठराव झाल्यावर तो कोरियाच्या वकीलमंडळाबरोबरच इ. स. १५९० मध्यें जपानांत परत आला. आपल्या वकीलास कोरियांत असभ्यपणानें वागविल्याबद्दल सूड घेण्याचा टेको सामानें निश्चय केला व त्यांस विनाकारण बरेच दिवसपर्यंत खोळंबत ठेविलें. शेवटीं तिरस्कारबुद्धिपूर्वक त्यांची भेट

घेऊन त्यांस फारच अपमानकारक रीतीनें वागविलें; व कोरियाच्या राजानें पाठविलेल्या पत्रास उद्धटपणाचें उत्तर लिहून आपला स्वारी करण्याचा निश्चय त्यास कळविला व नंतर त्यांस निरोप दिला. कोरियावर आतां खास स्वारी होणार असें पाहून कोरियाचा राजा रियेन यानें आपल्या मतें युद्धाची कडेकोट तयारी केली; परंतु जवळ जवळ दोनशे वर्षें देशांत शांतता नांदत असल्यामुळें कोरियांतील प्रजा युद्धकला बहुतेक विसरून गेली होती. जपानांत याच्या उलट स्थिति होती; शिवाय बंदुकांचाही उपयोग अलीकडे होऊं लागला होता. या गोष्टींमुळें जपानचा पक्ष बराच वरचढ झाला होता. सर्व तयारी झाल्यावर टैको सामानें कोनिशी नांवाच्या एका ख्रिस्ती सेनापतीच्या आधिपत्याखालीं क्यूशु बेटांत जमविलेलें सैन्य देऊन व इतर प्रांतांत गोळा केलेलें सैन्य काटो कियोमासा नांवाच्या सेनापतीच्या हाताखालीं देऊन व दोघांसही एकमेकांना मदत करण्यास सांगून त्यांस कोरियांत पाठविलें.

या स्वारीसंबंधानें जेसुइट लोकांचे विचार नमूद करण्यासारखे आहेत. कोरियावर मोहीम पाठविण्याचें ठरल्यानंतर हिडेयोषीनें पोर्चुगीज लोकांजवळ लढाईचें सामान पाठविण्याकरितां व प्रसंग पडल्यास लढण्याकरितां कांहीं जहाजें मागितलीं; परंतु त्यांनीं तीं न दिल्यामुळें त्यानें ख्रिस्ती लोकांस हांकून देण्याविषयीं आज्ञापत्र काढिलें. अरिमा येथील कांहीं ख्रिस्ती रूपवती युवती त्यास वश होईनात, ह्मणून त्यानें ख्रिस्ती लोकांवर हत्यार धरिलें. क्यूशु बेटांतील कांहीं जहागिरदार बे इमान व राजद्रोही आहेत असें वाटल्यावरून त्यांस देशांतरांत गुंतविण्यासाठीं त्यानें कोरियावर स्वारी केली. ख्रिस्ती लोकसंख्या कमी करण्याकरितांच क्यूशूतील पुष्कळ लोक त्यानें कोरियांत पाठविले. ओजीन गर्भांत असतांना त्याच्या आईनें ( जिंगोनें ) पराक्रम गाजविला ह्मणून जसें त्यास ' रणदेव ' असें नांव देण्यांत आलें तसें आपणासही चांगलेंसें नांव मिळावें ह्मणून त्यानें हा मार्ग स्वीकारला. हे व असले अनेक कुतर्क जेसुइट लोकासारख्या कपटी व कावेबाज मनुष्यांसच

शोभतात. ज्यांस टैको सामानें नोबुनागापाशीं काढलेले उद्गार अवगत असतील त्यांस तरी वरील आक्षेप घेतां येत नाहींत. असो.

कोरियास जरी चीनची मदत होती व दर्यायुद्धांत जरी एकवार जपानचा पराभव झाला तरी जपानी सैन्यानें कोरियाच्या सैन्याचे अनेक पराभव करून यश संपादन केलें; व कोरियापासून आपणास अनुकूल असे करार करून घेऊन व चीनच्या बादशहानें आपला वकील जपानांत पाठवावा असें ठरवून आणि कोरियामध्यें कांहीं सैन्य ठेऊन दोघेही सेनापति जपानांत इ० स० १९९९ मध्यें परत आले.

ठरावाप्रमाणें चिनी वकील टेको सामास एक मोठी प्रतिष्ठित पदवी देण्याकरितां इ.० स० १५९६ मध्यें निघाले. जपानांत आल्यावर त्यांचा त्यानें चांगला सत्कार केला; परंतु पदवीदानसमारंभाचे वेळीं आपणास 'बादशहा' असा किताब न देतां फक्त 'राजा' असा किताब दिला ह्मणून अत्यंत क्रुद्ध होऊन वकीलांनीं अर्पण केलेलीं मानाचीं वस्त्राभरणें तिरस्कारानें फेंकून देऊन, पुन्हां तुमच्यावर स्वारी करून तुमचें सैन्य जनावरांप्रमाणें चराचरा कापून काढीन असा त्यांच्याबरोबर निरोप पाठविला. बोलल्याप्रमाणें त्यानें १५९७ त पूर्वींच्याच सेनापतींनां मोठें सैन्य देऊन कोरियांत पाठविलें. ह्या सैन्यानें कोरियांत दोन वर्षेपर्यंत बराच धुमाकूळ घातला; परंतु अन्नसामुग्रीची टंचाई व कडक थंडी यांच्यामुळें त्याचे फार हाल व दुर्दशा झाली. सेनापतींमध्यें भांडणें सुरू झाल्यामुळें अनिष्ट परिणाम होऊं लागले. ही मोहीम शेवटास जाण्यापूर्वींच टेको सामा मरण पावला. त्याच्यामागें ईयासूवर लढाईची सर्व जोखीम पडली. परंतु तो प्रथमपासूनच युद्धाच्या विरुद्ध असल्यामुळें त्यानें कोरिया व चीन देशाशीं तह करून आपल्या सेनापतींस परत बोलाविलें. नंतर १६०७ मध्यें परस्परांनीं आपआपले वकील परस्परांच्या राज्यांत पाठवून तहाचीं कलमें कायम केलीं. ह्या वेळेपासून चीन देश कोरियाचा संगोपनकर्ता बनला आणि जपाननेंही ही गोष्ट कबूल केली. ही स्थिति १८७६ पर्यंत कायम होती; परंतु

ह्यावर्षीं कोरियानें अन्नसामुग्री व कोळसा मिळविण्याकरितां जपानच्या कांहीं अग्निनौकांवर हल्ला केला. तेव्हां जपाननें आपल्या सामर्थ्याचें पूर्ण प्रदर्शन करून कोरियाचा खरपूस समाचार घेतला. यानंतर कोरिया-संबंधानें चीन व जपान यांचेमध्यें १८९६ मध्यें युद्ध जुंपलें. कोरिया देश इ० स० १६०७ च्या तहाप्रमाणें आपला आश्रित आहे असें चीनचें ह्मणणें होतें; परंतु तो स्वतंत्र आहे असें जपानचें ह्मणणें होतें. शेवटीं जपानचा जय होऊन कोरिया स्वतंत्र आहे असें ठरलें. जपानशिवाय इतर कोणत्याही राष्ट्राचें वर्चस्व कोरियामध्यें असणें ही गोष्ट जपानच्या स्वातंत्र्यास विघातक आहे असें जपानी मुत्सद्यांस वाटत होतें ह्मणूनच त्यांनीं कोरियास चीनच्या सासुरवासापासून सोडविलें व आपलें वजन हळूहळू पाडण्यास सुरवात केली. कालांतरानें हा देश जपानच्या पूर्ण स्वामित्वाखालीं जाणार हें उघड आहे. ह्या लढाईत जपानास नवीन युद्धकौशल्याचा व शस्त्रास्त्रांचा उपयोग करण्याचा प्रथमच प्रसंग आला, व चीनासारख्या प्रचंड राष्ट्रावर जय मिळविण्यास तींच कारणीभूत झालीं हें पाहून जपानास समाधान वाटलें. या लढाईच्यायोगानें आपली किती सुधारणा झाली आहे हें जगास दाखविण्याची जपानास संधि मिळाली. जपानास यूरोपियन राष्ट्रांमध्यें आज जो मान मिळत आहे तो याच लढाईच्यायोगानें. याचेपूर्वी अनुकरणप्रियतेबद्दलच जपानची ख्याति यूरोपांत होती. परंतु त्या राष्ट्रांत बराच जोमही आहे असें या युद्धानें जगाच्या निदर्शनास आलें. या युद्धांत जय मिळविल्यामुळें जपान गर्वानें फुगून न जातां अवश्य अशा सुधारणा करण्यांतच ते गढून गेले, व यामुळेंच त्यास हल्लीं रशियावर जय मिळवितां आला.

# ख्रिस्तीधर्माचा प्रसार, उत्कर्ष आणि लय.

५.

आषिकागा घराण्यांतील शेगन अगदीं दुर्बल झाले होते त्यावेळीं ह्मणजे सुमारें इ. स. १५४२ मध्यें तुफानांत सांपडलेल्या एका पोर्तुगीज जहाजावरील तीन मनुष्यें जपानच्या दक्षिणेकडील एका बेटास लागलीं. ह्यानंतर १५४५ त मेंडेझपिंटो नांवाचा पोर्तुगीज गृहस्थ एका चिनी व्यापारी जहाजावरून क्यूशु बेटाच्या दक्षिणेस असलेल्या एका लहान बेटावर उतरला. त्या बेटाच्या मुख्य अधिकाऱ्यानें पिंटोस व त्याचे बरोबरच्या सर्व लोकांस उत्तम प्रकारानें वागविलें. या उपकाराची फेड करण्याकरितां पिंटोनें त्यास एक बंदुक नजर ह्मणून दिली व दारू कशी तयार करावी हेंही त्यास शिकवलें. वस्तूच्या नवीनत्वामुळें ती देणगी त्यास फारच आवडली व लवकरच त्या बंदुकीप्रमाणें बंदुका तयार करण्याचे कारखाने त्या प्रांतांत सुरूं झाले. ह्यानंतर बंगो प्रांताच्या सुभेदारानें कांहीं पोर्तुगीज लोकांस निमंत्रण केल्यावरून पिंटो ह्यानेंच तिकडे जाण्याचा बेत केला. तिकडे गेल्यावर त्यानें तेथलि सुभेदारास बंदुक उडविणें व दारू तयार करणें ह्या गोष्टी शिकविल्या. त्या सुभेदाराच्या मुलास तर बंदूक उडविण्याचा फारच नाद लागला व एके प्रसंगीं त्यास बरीच इजा झाली. परंतु पिंटोनें त्यास बरा केल्यावर सुभेदारानें प्रसन्न होऊन बरीच मोठी रक्कम बक्षिसादाखल त्यास देऊन त्याची रवानगी केली.

पिंटोनें १५४७ त व्यापाराकरितां कांहीं सवलती मिळविण्याकरितां दुसरी सफर केली. हिचे परिणाम फार दूरवर जाऊन पोहोंचले. पिंटोचे लोक जहाजावर असतांना कांहीं अपराध करून पळून जाणाऱ्या तीन जपानी मनुष्यांनीं अगदीं विकट प्रसंगीं आपणास जहाजावर घेण्याची मोठ्या काकुळतेनें विनंती केल्यावरून त्यांस जहाजावर घेतलें व त्यांचा

पाठलाग करणाऱ्या शिपायांनीं प्रतिबंध केला तरी त्यांस कांहीं एक उत्तर न देतां त्यांनीं जहाज हकारिलें व कांहीं दिवसांनीं मलाका बेटांत जाऊन पोहोंचले. तेथें धर्मप्रसाराचें काम चालविण्याकरितां प्रेषितनायक प्रसिद्ध सेवियरबावा नुकताच येऊन पोहोंचला होता त्याची व पिंटोची गांठ पडली. सेवियरचें लक्ष अर्थात् पिंटोबरोबरच्या जपानी मनुष्यांकडे लागलें. त्यानें त्यांस गोव्यास नेलें व तेथें त्यांना ख्रिस्ती करून त्यांस धार्मिक शिक्षणही दिलें, व तिघांना तीन—अँजिरो, जॉन व अँटनी—ख्रिस्ती नांवें देण्यांत आलीं. याप्रमाणें तयारी करून व आपल्या मदतीस आणखी कांहीं ख्रिस्तीभट घेऊन तो गोव्याहून निघाला व इ. स. १५४९ त कागोशिया नांवाच्या सत्सुम प्रांताच्या राजधानीच्या शहरांत येऊन पोहोंचला. तेथील प्रांताधिपतीनें त्यास चांगल्या तऱ्हेनें वागविलें इतकेंच नाहीं तर त्यास त्या शहरांत धर्मप्रसार करण्याचीदेखील परवानगी दिली. या शहरांत प्रथम अँजिरोच्या घरांतील माणसें ख्रिस्ती झालीं व नंतर बऱ्याच लोकांनीं ख्रिस्तीधर्म स्वीकारिला. याप्रमाणें त्या धर्माचें जपानांत बीजारोपण झालें. ह्यानंतर प्रांताधिपतीच्या पत्नीची अनुकूलता मिळविण्यांत येऊन ख्रिस्तीधर्माच्या प्रसारार्थ अनेक खटपटी सुरूं झाल्या. अशा रीतीनें जपानामध्यें ख्रिस्तीधर्म बळावत चालला असतां झेवियर बावानें जपानी लोकांच्या सौजन्याची फार तारीफ करावी ह्यांत कांहीं नवल नाहीं. असो.

पोर्तुगीज लोकांशीं व्यापार करण्याच्या अंतस्थ हेतूनेंच सत्सुम प्रांताच्या अधिपतीनें झेवियर यास धर्मप्रसार करण्याची परवानगी दिली होती; व पोर्तुगीज व्यापारी जहाजें हिराडो नांवाच्या जवळच्याच एका बंदरांत आल्याचें कळतांच त्यानें धर्मप्रसाराकरितां दिलेली परवानगी रद्द केली. तेव्हां टॉरिस नावाच्या एका प्रेषितास त्याच प्रांतांत ठेऊन आपण एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं या क्रमानें अनेक शहरें व खेडीं पहात पहात क्योटो येथें आला. परंतु कोठेंही डाळ शिजण्याचा संभव नाहीं असें पाहून धर्मप्रसाराचें काम कांहीं दिवस त्यास तहकूब ठेवणें भाग

पडलें. पुढें १५५१ त तो चीन देशामध्यें एक ख्रिस्तीमठ स्थापून धर्मप्रसार करण्याच्या इराद्यानें गेला. परंतु तो लवकरच ह्मणजे १५५२ मध्यें सॅन्शियन बेटांत मरण पावला. त्याचें प्रेत प्रथम मलाका बेटांत नेऊन नंतर गोव्यास आणिलें व तेथील मुख्य प्रार्थनामंदिरांत त्याचें उत्तरकार्य करण्यांत आलें.

झेवियरच्या मरणानें ख्रिस्ती प्रेषितगणाच्या कामास व्यत्यय आला असें मुळींच नाहीं. टॉरिस हा जपानांत राहिला होताच. त्यास साह्य करण्याकरितां आणखी कांहीं ख्रिस्ती भट आले व धर्मप्रसाराचें काम फार झपाट्यानें सुरूं झालें. या येशूभक्तांनीं बंगो प्रांतांत आपली मोहीम सुरूं केली व त्यांस चांगलेंच यश मिळालें. बंगोच्या संस्थानिकाचें त्यांना चागलेंच पाठबळ मिळाल्यामुळें ख्रिस्तीधर्मप्रसाराचे कामास चांगलेंच स्वरूप आलें. ओमुराचा संस्थानिक स्वतः ख्रिस्ती झाला व त्यानें आपल्या प्रांतांतील मनुष्यासच नव्हे तर बुद्धाच्या मूर्ती फोडून बौद्ध देवालयांसदेखील ख्रिस्ती बनविण्याचा सपाटा चालविला. क्योटो येथेंही धर्मोपदेश करण्यास त्यांनीं आरंभ केला, परंतु हा प्रयत्न सफल झाला नाहीं. ह्याच सुमारास पोर्चुगीज व्यापारी आपलीं गलबतें नांगरण्याकरितां एक चांगलेंसें बंदर पहात होते. तेव्हां नागासाकी हें स्थान फार सोयीचें आहे असें त्यांस आढळून आलें. नंतर ओमुराच्या संस्थानिकांचे साहाय्यानें त्यांनीं तें बंदर आपले ताब्यांत घेतलें. आपल्या जातीच्या व्यापारी मंडळीजवळच आपल्यास रहातां यावें ह्मणून ख्रिस्तीधर्मप्रसारक मंडळीनेंही हेंच शहर आपलें मुख्य ठिकाण केलें. तेथील पूर्वींचीं घरेंदारें पाडून शहराची नवीन रचना करण्यांत आली. जुनीं सिद्धायतनें पाडून नवीन प्रार्थनासदनें बांधण्यांत आलीं. याप्रमाणें ओमुराच्या संस्थानिकाचा आश्रय मिळाल्यामुळें इ. स. १५७३मध्यें नागासाकी शहर ख्रिस्तांचें मुख्य ठाणें बनलें, एवढेंच नाहीं तर इतर धर्माचा मनुष्य तेथें क्वचित् आढळून येत असे.

ह्याच सुमारास आषिकागा घराण्यांतील दुर्बळ शोगनांच्या हातांतूनच राज्यसूत्रें जाऊन तीं नोबुनाग नांवाच्या पराक्रमी व हुषार पुरुषाचे हातीं आलीं. ह्यांची सर्व कारकीर्द आपल्या शत्रूंशीं लढण्यांत व शत्रूंस मदत करणाऱ्या बलिष्ठ बौद्ध भिक्षुकांस शासन करण्यांतच गेली. यामुळें परधर्माच्या प्रसारानें देशाचें कोणत्या प्रकारचें नुकसान होत आहे हें त्यांच्या बिलकुल लक्षांत आलें नाहीं. उलट परधर्मप्रसारार्थ त्यानें ख्रिस्ती दूतगणांस बरीच मदत केली. त्याच्या आश्रयानें क्योटो राजधानींत एक व बिवा सरोवराच्या रम्य कांठावर एक अशीं दोन प्रार्थनालयें बांधण्यांत येऊन धर्मोपदेशदेखील त्यांत होऊं लागला, व त्याचे मरणाचे वेळीं ह्मणजे इ. स. १५८२त जपानांत ख्रिस्तीधर्म भरभराटीच्या अगदीं शिखरास जाऊन पोहोंचला. ह्याच वर्षीं ख्रिस्ती जपानी लोकांच्या तर्फें एक वकीलमंडळ रोम शहरीं पोपच्या भेटीस पाठविण्यांत आलें. ह्या मंडळांत दोन ख्रिस्ती जपानी राजपुत्र, त्यांचे दोन सल्लागार व दोन पोर्चुगीज धर्मोपदेशक होते. ते पहिल्यानें लिस्बन येथें व नंतर माद्रीड शहरीं गेले. यावेळीं स्पेन व पोर्चुगाल हीं दोन्हीं राज्यें दुसरा फिलिप याचे अमलाखालीं एकत्र झालीं होतीं. दोन्ही शहरच्या लोकांनीं त्यांचा अतिशय थाटानें सत्कार केला. नंतर ते धर्मगुरु पोप यास भेटण्यासाठीं रोम येथें गेले. नगरप्रवेश करण्याच्या वेळीं तेथील मोठमोठे अमीरउमराव त्यास सामोरे गेले व त्यांनीं मोठ्या समारंभानें जपानी वकिलास धर्मगुरूच्या वाड्यांत ह्यावेळीं तेरावा ग्रेगरी हा धर्मासनारूढ झालेला होता. त्यानें राजपुत्रानें आणलेले नजराणे घेतले व त्यानीं आपल्यावरोवर आणलेल्या पत्रांस उत्तरेंही दिलीं; व त्यांस मोठ्या मानाच्या पदव्या देऊन निरोप दिला. हें वकीलमंडळ पोपचीं आज्ञापत्रें घेऊन इ० स० १५९० चे सुमारास जपानांत परत आलें. यावेळीं जपानांत सहा लाखांपेक्षां जास्त लोक ख्रिस्ती झालेले होते. ख्रिस्ती धर्माच्या उत्कर्षाची ही परमावधीच होय. याप्रमाणें पोर्चुगीज लोकांचे पांढरे पाय जपानास लागल्यापासून चाळीस वर्षांचे आंत व झेवियर याचा मरण पावल्यापासून तीस वर्षांचे आंत

जपानांत धर्मप्रसार इतक्या त्वरित झाला कीं, तसा तो कोणत्याही देशांत ( हिंदुस्थानांत दुष्काळाचीं वर्षे शिवायकरून ) झाला नसेल. परंतु समुद्रास पूर्ण भरती आल्यावर ज्याप्रमाणें ओहटी सुरू होते, त्याप्रमाणें इ० स० १५८७ पासून ख्रिस्ती धर्माच्या अपकर्षास सुरवात झाली परंतु जें काम करण्यास पोर्तुगीज पाद्री लोकांस तीस वर्षेदेखील लागलीं नाहींत त्या कामाचा विध्वंस करण्यांत जपानच्या राष्ट्रास दीडशें वर्षं देखील पुरलीं नाहींत.

नोबुनागाप्रमाणेंच हिडेयोषी याचें लक्ष प्रथम वरील गोष्टीकडे गेलें नाहीं. पण एका पोर्तुगीज सेनाधिपतीनें काढलेले मूर्खपणाचे उद्गार ( माझा राजा प्रथम धर्मोपदेशक पर देशांत पाठवून तेथील प्रजेस ख्रिस्ती करितो व नंतर ख्रिस्ती लोकांच्या मदतीस सैन्य पाठवितो; अशा रीतीनें तो देश जिंकण्याचें काम सुलभ रीतीनें व पूर्णपणें शेवटास जातें. ) याच्या कानावर गेल्यावर तो सावध झाला व इ. स. १५८७मध्यें ख्रिस्ती धर्माचा वीमोड करण्याकरितां त्यानें असा हुकूम फर्माविला कीं सर्व परधर्मीय धर्मोपदेशकांनीं २० दिवसांत जपान सोडून जावें. जे न जातील त्यांस ठार मारण्यांत येईल. हा हुकूम व्यापारी मंडळीस लागू नव्हता. परंतु त्यांनीं पाद्री लोकांस आपल्या जहाजांवर आश्रय देऊं नये व आपल्या जहाजांवरून त्यास परदेशांतून जपानांत आणूं नये ह्मणून त्यानें असा जाहिरनामा काढला कीं व्यापारी जहाजावर पाद्री लोक सांपडल्यास तीं जहाजें जप्त करण्यांत येतील. ह्या हुकुमाची अम्मलबजावणी प्रथम योग्य रीतीनें झाली नाहीं. परंतु वरील नियम अनुल्लंघनीय आहे हें ख्रिस्ती लोकांच्या निदर्शनास आणण्याकरितां व त्यांस दहशत बसविण्याकरितां १५९३त क्योटो व ओसाका येथील नऊ पाद्री लोकांस ते सरकारी हुकुमास न जुमानतां नवीन प्रार्थनालयें बांधीत होते ह्मणून नागासाकी येथें नेऊन जिवंत जाळून टाकण्यांत आलें. ह्याचा अर्थात् इष्ट असा परिणाम झाला. पण यानंतर पूर्ववत् शिथिलता सुरू झाली व धर्म-

प्रसाराचें काम जारीनें होऊं लागलें. टैकोसामा मेल्यानंतर ईयासु हा राज्यसूत्रचालक बनला. दुसऱ्या अनेक महत्त्वाच्या कामामुळें त्यास प्रथम जरी या अनर्थकारक गोष्टीकडे लक्ष देण्यास फुरसत झाली नाहीं तथापि सर्वत्र शांतता झाल्यावर त्यानें १६०६ मध्यें आपल्या हाताखालच्या अमलदारांस टैकोसामा ह्याच्या १५८७ मधल्या हुकमाची आठवण करून तो कडकपणानें अमलांत आणण्याची त्यांस ताकीद दिली. ईयासु हा फार चाणाक्ष होता. क्यूशु बेटांतील पुष्कळ लोक व कांहीं संस्थानिक परधर्मी बनले होते. हे संस्थानिक आपलें वजन व अधिकार यांचा प्रजेस धर्मांतर करावयास लावण्याचे कामीं उपयोग करीत असत. यामुळें त्रासून कित्येक लोक द्वीपत्याग करीत, कित्येकांस आपल्या जमिनी सोडून द्याव्या लागत असत व कित्येकांस अनेक प्रकारचे हाल अथवा अपेष्टा सोसण्याचा प्रसंग येई. अशाप्रकारें प्रजेचा छल होत असल्यामुळें लोक फार असंतुष्ट झाले होते. बरेच लोक हा सर्व त्रास निमूटपणें सोशीत असत. परंतु पुष्कळ लोक ख्रिस्ती होऊन छलापासून आपली मुक्तता करून घेत. या ख्रिस्ती लोकांवर व संस्थानिकांवर पोर्तुगीज धर्माधिकाऱ्यांचें बरेंच वजन असल्यामुळें ख्रिस्ती लोकांचें राजकीय प्राबल्य फार वाढत चाललें होतें. ही गोष्ट स्वराज्यास फार अनिष्टकारक आहे असें त्याच्या लक्षांत आल्यामुळेंच त्यानें टैकोसामाचा हुकूम शब्दशः अमलांत आणण्याची आज्ञा केली हें उघड आहे. परंतु ह्या आज्ञेस न जुमानतां नालासाकी येथील सर्व पंथाच्या रोमन कॅथोलिक लोकांनीं जेसुईट पंथाचा संस्थापक इग्नेशस लायोला याचा फारच थाटानें उत्सव केला. ईयासूस हा जाणून बजून केलेला अपमान सहन न होऊन, ख्रिस्ती धर्माच्या उच्छेदार्थ त्यास अतिशय तीव्र उपायांची योजना करणें भाग पडलें. अशांतच ह्मणजे इ० स० १६११ त जपानचें राज्य परतंत्र करण्यासाठीं जपानी ख्रिस्ती व परकीय धर्मोपदेशक यांनीं कट केला आहे असा लेखी पुरावाही त्यास मिळाला. ह्मणून ख्रिस्ती धर्म नाहींसा करण्याचा त्यानें निश्चय केला. त्यानें १६१४ मध्यें देशांतील सर्व जपानी व पोर्तुगीज धर्मोप-

देशक नागासाकी येथें पाठविण्याचा हुकूम केला व इतर ख्रिस्ती लोक उत्तरेकडील झुगरू बेटांत पाठविण्याची व्यवस्था केली. क्यूशु बेटांत दंगेधोपे होऊं नयेत ह्मणून दहा हजार सैन्य पाठविण्यांत आलें. धर्मांतर केलेल्या लोकांस पुन्हा स्वधर्मांत येण्याची मोकळीक ठेविली होती; व जे असें न करितील त्यांचा भयंकर रीतीनें छल करावयाचा असें ठरविण्यांत आलें. प्रथम जाहीरपत्रकें * काढून सर्वांस या ठरावाची समजूत दिल्यानंतर १६१४ च्या अगदीं अखेरीस छलास सपाट्यानें आरंभ झाला. ठरल्याप्रमाणें नागासाकी व झुगरू येथें ख्रिस्ती लोकांचा भरणा केला. जे लोक लपून बसले असतील त्यांचा शोध करून त्यास स्वधर्मांत येण्यास लावण्याकरितां ख्रिस्तान्वेषक संस्था स्थापण्यांत आली. या संस्थेतील मंडळींनीं धर्मांतर केलेल्या लोकांस अनेक प्रकारच्या शारीरिक पीडा देऊन नवीन धर्म त्यागावयास लावावयाचें व तसें न केल्यास हालहाल करून ठार मारावयाचें हा क्रम आरंभिला. इ. स. १६१६ मध्यें ईयासु मरण पावल्यावर किरिस्तानांच्या छळास विशेषच जोर आला. त्यांची सर्वांत जास्त संख्या क्यूशु बेटांत व विशेषें करून नागासाकी येथें होती ह्मणून जपानी तेथें अधिकाऱ्यांनीं फारच बारकाईनें चौकशी सुरूं केली. प्रत्येक रस्त्यावर कांहीं शिपाई ठेविलेले असत व प्रत्येक पांच घरांवर एक नायक नेमलेला असे. त्यानें प्रत्येक घरांत काय चाललें आहे यावर नजर ठेवण्याचें काम करावयाचें असे. याप्रमाणें सर्व बंदोबस्त झाल्यावर मुख्य अधिकारी स्वतः शोधार्थ निघे. स्वधर्मांत परत येण्यास जे तयार असत, त्यांस बिलकुल त्रास देण्यांत येत नसे. इतरांस मात्र छल करणाऱ्या अधि-

* टीपः— या जाहीरनाम्यांतील शेवटचा मजकूर असा होता 'या जगावर जोंपर्यंत सूर्य प्रकाश पाडीत आहे, तोंपर्यंत कोणत्याही किरिस्तानानें जपानांत येण्याचें धाडस करूं नये; व सर्वांनीं ही गोष्ट लक्षांत ठेवावी कीं स्पेनचा राजा जरी स्वतः आला, किंवा किरिस्तानांचा देव जरी आला अथवा त्यांचा परमेश्वरही जरी प्रत्यक्ष आला, तरी वरील हुकूम अमान्य केल्याबद्दल त्याचा देखील शिरच्छेद होईल. मग इतरांची काय कथा !

काऱ्यांच्या स्वाधीन करण्यांत येत असे. छल करितांना जे लोक आपल्या पूर्वीच्या धर्माप्रमाणें चालावयास तयार असतील त्यांस सोडून देण्यांत येत असे व बाकींच्या लोकांस ठार मारण्यांत येत असे. हा क्रम १६१६ पासून १६२६ पर्यंत चालू होता, तरी नागासाकी येथें १६२६ त चाळीस हजार खिस्तीलोक राहिलेच होते. परंतु या वर्षापासून अतिशय सक्तीचे कायदे अमलांत आणिल्यामुळें १६३० मध्यें त्या शहरांत एकही खिस्ती राहिला नाहीं!! यांच्यापैकीं पुष्कळांनीं नवीन धर्माचा त्याग केला, बरेच लोक गुप्तपणें शहर सोडून दूर जाऊन राहिले व कित्येक नागासाकी जवळच्याच खेड्यापाड्यांतून अथवा इतर सुरक्षित ठिकाणीं जाऊन लपून बसले व हजारों लोक प्राणास मुकले. शेवटीं या लपून बसलेल्या लोकांचाही छल सुरू झाला व कालांतरानें त्यांचा उच्छेद करण्यांत आला. जपानी लोकांच्या छळ करण्याच्या अनेक तऱ्हा होत्या. जे लोक स्वधर्मांत येण्यास तयार नव्हते त्यांना एकासमोर एक असे उभे करून तरवारीनें त्यांच्या माना उडवावयाच्या, कढत पाण्याच्या झऱ्यांत बुडवावयाचें, कड्यावरून खालीं लोटून द्यावयाचें, बैलाकडून भोंसकून मारवावयाचें, जिवंत पुरावयाचें, मनुष्यांस पोत्यांत घालून तीं एकावर एक अशीं रचावयाचीं व त्यांस आग लावून द्यावयाची, हाता-पायांच्या नखाखालीं लोखंडी कांटे शिरकवून असह्य वेदना द्यावयाच्या, लाठ्यांनीं बेदम मारावयाचें, अंग सोलून त्यावर आधणाचें पाणी ओता-वयाचें, लाल केलेल्या लोखंडी कांबांनीं डाग द्यावयाचें, स्त्रियांस नग्न करून त्यांस रांगत चालवावयाचें, त्यांच्यासमक्ष त्यांचीं मुलें मारावयाचीं, मनुष्यास आपलेंच रक्त अगर मांस खावयास लावावयाचें, उलटें टांगून ठेवावयाचें, येशूची मूर्ति व त्याच्या वधस्तंभासारखी आकृति पायांखालीं तुडवावयास लावून खिस्ती धर्माबद्दल अत्यंत तिरस्कार व्यक्त करावयास लावावयाचें; हीं व यांच्यापेक्षां अधिक भयंकर छल करण्याचीं साधनें उपयोगांत आणिलीं जात होतीं. अशा प्रकारच्या राक्षसी उपायांनीं जपानी खिस्तीच नव्हे तर पोर्तुगीझ जेसूइट लोकांनीं देखील आम्हीं खिस्ती नाहीं असें कबूल केलें ह्यांत नवल नाहीं. परंतु असलीं भयंकर

साधनें योजून देखील ख्रिस्ती धर्माचें पूर्ण निर्मूलन झालें नाहीं हेंच आश्चर्य होय.

वाचकहो! वरील अंगावर शहारे आणणारे, अतिशय क्रूरपणाचे व किळस उत्पन्न करणारे छळाचे प्रकार वाचून जपानी लोक फारच रानटी व निर्दय होते अशी कदाचित् तुमची कल्पना होईल. परंतु असली शंकादेखील तुमच्या मनांत येऊं देऊं नका. त्यावेळचें युग हल्लींपेक्षां फार निराळें होतें. आपल्या धर्माचा प्रसार व्हावा, परदेशाशीं व्यापार करून आपण सुखसंपन्न व्हावें, आपल्या राष्ट्राच्या मर्यादा विस्तृत व्हाव्या, इत्यादि कल्पना त्यावेळीं प्रत्येक राष्ट्रांतील लोकांच्या मनांत वास करीत असत व आपले हेतु तडीस नेण्याकरितां ते वाटतील तीं अनन्वित कृत्यें करण्यास तयार असत. एकाच धर्मांत जर दोन पंथ असले तर एका पंथांतील लोक दुसऱ्या पंथांतील लोकांचा छळ करीत असत. मग एका धर्माचे लोक दुसऱ्या धर्मांतील लोकांचा छळ करीत असत ह्यांत नवल तें काय? धर्मस्वातंत्र्याची कल्पना हिंदु-लोकांशिवाय जगांतील त्यावेळच्या अत्यंत सुधारलेल्या राष्ट्रांतील लोकांच्या मनांत आलेली नव्हती. युरोपांतील त्याकाळीं सुधारलेला व बलाढ्य असा स्पेन देश होता. पण त्या देशाचा राजा दुसरा फिलिप यानें केवळ आपल्या बाहुसामर्थ्यानें डच लोकांस आपला धर्म (रोमन कॅथोलिक) स्वीकारण्यास लावण्याचा प्रयत्न चालविला होता. जपान-मध्येंही प्रथम पोर्तुगीज धर्मप्रसारक मंडळीनें राजप्रतिनिधीच्या साहाय्यानें लोकांस बलात्कारानेंच ख्रिस्ती होण्यास लाविलें होतें. अशा स्थितींत परकीयांपासून अगदीं अलग राहूं इच्छिणाऱ्या व परकीयांच्या व परध-र्माचा पहिल्यापासून द्वेष करणाऱ्या जपानी लोकांनीं आपल्या धर्माचें व विस्खलित होत चाललेल्या राष्ट्राचें संरक्षण करण्यासाठीं ख्रिस्ती-धर्माचा विनाश करण्यास्तव त्यांच्याच मार्गाचें अवलंबन केल्याबद्दल युरोपियन राष्ट्रांनीं जपानास दोष देणें ह्मणजे आपल्या डोळ्यांतील मुसळाकडे लक्ष न देतां दुसऱ्याच्या डोळ्यांतील कुसळ मात्र अतिशय बारकाईनें पाहण्यासारखें आहे.

धर्मस्वातंत्र्य ही एक पाश्चात्य कल्पना आहे खरी; पण तिची मजल केवळ वल्गनेच्या पलीकडे अद्यापि गेलेली नाहीं. युरोपामध्यें तुर्कस्थान शिवाय करून सर्व राष्ट्रांत ख्रिस्ती धर्म प्रचलित असल्यामुळें त्या खंडांत धर्मस्वातंत्र्य आहे असें ह्मणण्यापेक्षां पंथस्वातंत्र्य आहे असें ह्मणणें जास्त सयुक्तिक दिसतें. त्यांच्यापैकीं एकाद्या राष्ट्रांत जर परधर्माचें प्राबल्य होत चाललें, तर तिकडे ज्यांनीं ख्रिस्ती धर्माचें संरक्षण करण्याचा विडा उचलला आहे, असे राजे लोक दुर्लक्ष करितील अथवा उदासीनवृत्ति स्वीकारतील हें संभवत नाहीं. मुसलमानांप्रमाणेंच ख्रिस्ती लोकांनींही तरवारीच्या जोरावर धर्मप्रसार करण्याचा कित्येक शतकेंपर्यंत बाणा बाळगला होता; व हल्लीं युरोपांत जरी अशा रीतीनें तो धर्म वाढविण्याची अवश्यकता नाहीं तरी युरोपियन लोक युरोपापासून जसजसे लांब जातात, तसतसे धर्मस्वातंत्र्याचें तत्व ते अगदीं विसरून जातात, एवढेंच नाहीं तर आपल्यास आपल्या राष्ट्राच्या सामर्थ्याचें पूर्ण पाठबळ आहे हें जाणून इतर खंडांतील राष्ट्रांतील लोकांस जवळ जवळ पाद्री लोक ख्रिस्ती होण्यास लावितात. धर्मस्वातंत्र्याची कल्पना उदात्त आहे खरी; परंतु ती युरोपियन लोकांच्या डोक्यांत एकदम अकस्मात् शिरली असें नाहीं. हिंदुस्थानांतील १८५८ सालचें शिपायांचें बंड अथवा चीनांतील १९०१ सालचें बाक्सर लोकांचें बंड–ह्यासारख्या अनेक प्रसंगांनीं ती त्यांच्या डोक्यांत शिरविली. एर्‍हीं ही कल्पना युरोपाशिवाय इतर खंडांस लागू झाली नसती हें उघड आहे. ही कल्पना हिंदुधर्मास तर फारच विघातक झालेली आहे. कारण हिंदुधर्मांत इतर धर्माचे लोक तर येतच नाहींत; परंतु हिंदुधर्मांतील मनुष्य ख्रिस्ती अगर मुसलमान झाला तर धर्मांतर केलेल्या मनुष्यास शासन करण्याचा अधिकार त्या समाजास रहात नाहीं. तेव्हां वास्तविक पाहिलें असतां ह्या अजब कल्पनेचा फायदा बहुतेक ख्रिस्तीधर्मासच मिळतो. असो.

जपानी लोक परधर्मीयांचा द्वेष करणारे होते व ख्रिस्ती लोकांची संख्या जपानांत तर अतोनात वाढलेली होती. अशा स्थितींत दोन्ही

धर्माचे लोक त्यादेशांत सलोख्यानें व शांततेनें राहणें असंभाव्य होतें ही परिस्थिति लक्षांत आणून, वेळींच दुर्बल परंतु जोमांत येत चाललेल्या आणि परिणामीं अतिशय धोक्याच्या अशा नवीन धर्माचा उच्छेद करण्यास टैकोसामा व गोंजेनसामा यांनीं फार शहाणपणानें व दूरदृष्टीनें आरंभ केला, याबद्दल त्यांची निदान आशियांतील लोक तरी तारीफ केल्यावांचून रहाणार नाहींत-

या किरिस्तान–सत्राची पुढची इत्थंभूत हकीकत देण्यांत कांहीं अर्थ नाहीं. मागें जो क्रम चालला होता तोच पुढेंही चालू ठेविला होता. प्रतिवर्षी हजारों ख्रिस्तीलोक यमयातना सोशीत असत व शेकडो प्राणास मुकत असत. तथापि या सत्राची शेवटची कथा सांगणें आवश्यक आहे. इ. स. १६३६ च्या अखेर क्यूशु बेटांत अरीमा प्रांतांत एक मोठें बंड झालें. या प्रांताचा पहिला सुभेदार बदलून त्याचे जागीं दुसरा आला. ह्यानें इतका जबरदस्त कर बसविला कीं, तो देण्यास शेतकरी लोकांस फार कठीण जाई. जे कर देत नसत त्यांचा ख्रिस्ती लोकांप्रमाणेंच तो छळ करी. या त्याच्या दुष्टपणामुळें त्रस्त होऊन त्यांनीं बंड केलें. ह्यांस जवळच्याच एका लहानश्या बेटांतील लोकही येऊन मिळाले. हें पाहून निराश झालेल्या ख्रिस्ती लोकांस वाटलें कीं, जपानी सरकारचा सूड घेण्यास ही संधि उत्तम आहे व ह्मणून ते तावडतोब बंडवाल्यांस जाऊन मिळाले. अशा रीतीनें १६३७त बंडास चांगलेंच स्वरूप आलें. शेतकरी बंडवाल्यांचा पुढारी आष्टीझुका नांवाचा एक साहसी मनुष्य होता. त्याचे मनांत शिमाबरा किल्ला प्रथम सर करून घ्यावयाचा होता; परंतु ख्रिस्ती बंडवाल्यांचा पुढारी शिरो यांचे मनांत नागासाकी येथील जपानी सैन्यावर हल्ला करून पोर्चुगीज व डच व्यापारी यांचें साहाय्य मागावयाचें होतें. दोघांचें एकमत न झाल्या कारणानें दोघांनींही आपआपल्या मताप्रमाणें केलें; परंतु शिरो याचा बेत फसला. आश्टिझुका याचा बेत सिद्धीस गेला व ह्या किल्ल्यांतील अन्नसामग्री घेऊन त्यानें द्वारा

नांवाचा दुसरा किल्लाही हस्तगत केला. येथेंच त्यास ख्रिस्ती लोकही येऊन मिळाले. ह्याठिकाणीं एकंदर बंडवाले चाळीस हजारापेक्षां जास्त होते. इतक्या लोकांशीं लढणें क्यूशु बेटांतील सुभेदारांस अशक्य वाटल्यावरून त्यांनीं यद्दो येथें असलेल्या शोगनास कुमक पाठविण्याबद्दल लिहिलें. ह्यावेळीं गोंजेनसामाचा नातु शोगन होता. आपल्या आज्याप्रमाणेंच हा पराक्रमी मुत्सद्दी आणि परधर्मीयांचा द्वेष करणारा होता. हें जें बंड झालें तें ख्रिस्ती लोकांच्याच चिथावणीनें झालें असा त्यास पक्का संशय आला होता व ह्मणून कांहींही झालें तरी बंडवाल्याचें पूर्ण पारिपत्य करावयाचें असा निश्चय करून इताकुरा नैझेन नांवाच्या सेनापतीस अधिकार देऊन त्यास मोठ्या सैन्यानिशीं बंडवाल्यांचा मोड करण्याकरितां क्यूशु बेटांत पाठविलें. त्या बेटांतील सुभेदारांनीं देखील बरेंच सैन्य कुमकेस पाठविलें. या फौजेनें १६३८ च्या आरंभीं हारा किल्ल्यास वेढा घातला व आंतील बंडवाल्यास लवकरच जेरीस आणावयाचें अशा महत्वाकांक्षेनें बादशाही सैन्यानें त्या किल्ल्यावर फार जोराचे हल्ले केले. परंतु आपला पराभव झाल्यास आपल्यापैकीं प्रत्येकास प्राणास मुकावें लागेल या भीतीनें फार शौर्यानें लढून त्यांनीं सर्व हल्ले मागें फिरविले. किल्ला लवकर काबीज होण्याचें चिन्ह दिसेना तेव्हां बादशाही सैन्यानें डच लोकांजवळ दारूगोळा व तोफा आणि नंतर कांहीं दिवसांनीं एक लढाऊ जहाजही मदतीसाठीं मागितलें. डच लोकांच्या वखारींच्या अधिकाऱ्यानें ही सर्व मदत दिली. परंतु "जपानांत शूर लोक पुष्कळ असूनही परकीयांची मदत तुह्मी घेतली ही गोष्ट तुह्मांस लांछनास्पद आहे" असें एक पत्र किल्ल्यांतील एका मनुष्यानें आपल्या बाणास बांधून वेढा घालणाऱ्या सैन्यांत टाकिलें. ह्या कारणानें ह्मणा अगर दुसऱ्या कोणत्याही कारणानें ह्मणा डच लढाऊ जहाजाच्या अधिकाऱ्यास "तुमची मदत आह्मास नको" असें सांगून परत पाठविलें. शेवटीं जोराचे व निकराचे हल्ले केल्यानंतर बंड सुरू झाल्यापासून सात महिन्यांनीं व वेढा सुरू झाल्यापासून १०२ दिवसांनीं 'हारा' किल्ला बादशाही सैन्याच्या हस्तगत

झाला. यानंतर किल्ल्यांतील सर्व पुरुष, बायका व मुलें यांस अत्यंत क्रूरपणानें ठार मारण्यांत आलें. याप्रमाणें या बंडाचा शेवट झाला व जपानांतील ख्रिस्तीधर्माचा देखील बहुतेक शेवट झाला असें ह्मणण्यास हरकत नाहीं. याच्यानंतर देशांत इतर ठिकाणीं असलेले ख्रिस्ती जपानी व पोर्तुगीज पाद्री यांचा शोध सुरू होऊन पुष्कळांस ठार मारण्यांत आलें. तरी चोरून लपून बसलेले लोक बरेच राहिले. यांचें निर्मूलन करण्याकरितां यद्दो येथें एक कायमचीच किरिस्तानाविषयक मंडळी स्थापण्यांत आली आणि तिला मदत करण्याकरितां सर्व देशांत लोक नेमण्यांत आले. ही मंडळी वारंवार नवीन नवीन कायदे करून ख्रिस्ती धर्माचा उच्छेद करीत होतीच. यद्दोजवळ किरिस्तानदरी ह्मणून एक स्थल आहे. त्या ठिकाणीं एक कारागृह बांधून त्यामध्यें ख्रिस्ती लोकांस कोंडून ठेवीत असत. येथेंच चिआरा नांवाचा एक जेसुईट चाळीस वर्षेंपर्यंत कोंडून ठेविला होता. तसेंच सिडोटी नांवाचा एक सिसिली बेटांतील पाद्री पोर्तुगीज लोकांनीं अर्धवट सोडून दिलेलें धर्मप्रसाराचें काम पुढें चालविण्याची प्रतिज्ञा करून आला होता ह्यासही येथेंच १७०७ पर्यंत कोंडून ठेविलें होतें. या संस्थेचें काम १७ व्या शतकांत जितक्या नेटानें व कडकपणानें चाललें होतें, तसें १८ व्या शतकापासून पुढें चाललें नाहीं. ह्यामुळें १८६९ मध्यें नागासाकी जवळच्या खेड्यांतून सुमारें चार हजारांपेक्षां जास्त लोक आढळून आले. ह्या गोष्टीचा ख्रिस्ती राष्ट्रांस मोठा अभिमान वाटतो. या भित्र्या ख्रिस्ती लोकांनीं आपलीं धर्ममतें अतिशय गुप्त ठेविलीं होतीं व योग्य संधि मिळतांच त्यांनीं आपलें अस्तित्व प्रकट केलें. ही संधी ह्मणजे परकीयांस व्यापारासाठीं कांहीं बंदरें खुलीं करण्यांत आलीं त्यांत नागासाकीही होतें हीच होय. या लोकांविरुद्ध जपानसरकारनें एक जाहीरपत्रक काढलें. या रीतीनें आपल्या धर्माचा अपमान होतो ह्मणून प्रत्येक ख्रिस्ती राष्ट्राच्या वकीलानें त्या पत्रकास हरकत घेतली. परंतु पाखंड मताचा प्रसार जपानांत होऊं द्यावयाचा नाहीं असा राष्ट्राचा कायदा आहे व या कायद्याची अमलबजावणी करण्याचा प्रत्येक अधिकाऱ्यास अधिकार आहे.

वरील प्रश्न जपानच्या हिताहिताचा असल्यामुळें व परकीय लोकांस ही गोष्ट चांगलीशी कळत नसल्यामुळें, त्यांस ह्या प्रकरणांत हात घालण्याचा अधिकार नाहीं असें त्यांस चोख उत्तर जपानी अधिकाऱ्यांनीं दिलें. पुष्कळ लोकांस हद्दपार करण्यांत आलें व ज्यांनीं पाखंडमताभिमान सोडिला नाहीं त्यांस कडक शिक्षा देण्यांत आली. परंतु पाश्चात्त्यांची त्या ख्रिस्ती लोकांविषयीं सहानुभूति आहे असें पाहून नेहमींपेक्षां ती शिक्षा बरीच सौम्य केली होती. युरोपियन लोकांनीं जपानवर कसा वचक बसविला ह्यासंबंधी हकीकत पुढील प्रकरणांत येईल. ह्या वचकामुळें त्यांचें जपानास ऐकणें भाग पडे; अर्थात् त्यांस ख्रिस्ती लोकांविरुद्ध कायदे प्रथम शिथिल करणें व नंतर रद्द करणें प्राप्त झालें. इ० स० १८७२ त तर हद्दपार केलेले सर्व ख्रिस्ती जपानी लोकांस परत येण्याची परवानगी मिळाली व त्यांचा छळ करण्याविषयींचे सर्व कायदे रद्द झाले व जपानांत धर्मस्वातंत्र्य असावें असें ठरलें. जपानमध्यें ख्रिस्ती धर्माचा प्रथम प्रसार होणे व लागलीच त्याचें निर्मूलन करण्यास आरंभ करणें ह्या दोन्ही गोष्टीमुळें जापनच्या इतिहासांतील हें उपकथानक फारच मनोरंजक झालेलें आहे. जपानांतील आधुनिक ख्रिस्ती-धर्मप्रसाराची हकीकत पुढें धर्म या प्रकरणांत दिलेली आहे.

---

# विदेशीयांस जपानांत व्यापार करण्याची मोकळीक कशी मिळाली ?

६.

युरोपांतील राष्ट्रें सर्व जगावर आज राज्य करीत आहेत हें मुख्यतः त्यांतील लोकांच्या प्रवास करण्याच्या आवडीचें फल होय. प्रवास करण्यास लागणारें धाडस, धिमेपणा, चिकित्सकपणा, शौर्य इत्यादि गुण व त्यांची सहचारिणी बंदुक यांची त्यांस बरीच अनुकूलता होती; आणि ह्मणूनच त्यांस यशःप्राप्ति झाली. युरोपांतील प्रवासी फार प्राचीन कालापासून पूर्वेकडील सुधारलेल्या देशांत पर्यटण करीत असत; पण त्यांच्यापैकीं फारच थोड्या लोकांचीं प्रवास-वर्णनें उपलब्ध आहेत. मार्कों पोलो (१२५०—१३२३) नांवाच्या एका व्हिनिशियन प्रवाशानें इराण, हिंदुस्तान व चीन या देशांत प्रवास करून त्या प्रवासाचें सुंदर वर्णन लिहून ठेविलें होतें. ह्याच वर्णनामुळें कोलंबसास पश्चिमेकडून हिंदुस्थानचा मार्ग शोधून काढण्याचा नाद लागला होता; व या प्रयत्नामुळेंच शेवटीं त्यास अमेरिका खंडाचा शोध लागला. मार्कों पोलोच्याच प्रवास-वर्णनामुळें पोर्तुगीज लोकांस—कोणच्याही कां मार्गानें होईना पण—हिंदुस्थानांत एकदां येऊन पोहोंचण्याची प्रबल इच्छा उत्पन्न झाली व अखेरीस वास्को डी गामा यास आफ्रिकेच्या दक्षिणेकडून हिंदुस्थानचा मार्ग सांपडला. पुढें प्रवास करणें हा कित्येकांचा धंदाच बनला. मंगो पार्क, लिव्हींगस्टन्, स्टॅनले इत्यादि इंग्लिश व कित्येक जर्मन व फ्रेंच प्रवासी, आफ्रिका खंडांतील दाट अरण्यांतून व रानटी लोकांच्या वस्तींतून प्रवास करून आपआपल्या राजास बराच सुपीक मुलुख मिळवून देण्यास कारणीभूत झाले. हंबोल्ट व हडसन यांनीं दक्षिण अमेरिकेच्या भयंकर व निर्जन प्रदेशांतून प्रवास करून सर्व राष्ट्रांचें डोळे तिकडे फिरविले. कुक् यानें आस्ट्रेलियाचा शोध लाविला व तें बेट इंग्रजांस मिळालें. दक्षिण व उत्तर ध्रुवाकडील प्रदेश शोधण्याचें

काम अद्यापि चालू आहेच. आशियाच्या मध्यभागाची रशिया व इंग्लंड यांचेमध्यें वांटणी चाललीच आहे. येणेंप्रमाणें प्रवास व बंदूक याच्यामुळें सर्व जग पाश्चात्त्यांच्या भक्ष्यस्थानीं १९ व्या शतकाच्या आरंभीं पडलें. जेथें देश सुपीक पण लोक रानटी होते तेथें त्यांची कत्तल करून वसाहती स्थापन करण्यांत आल्या; परंतु जेथें संहार करणें इष्ट व शक्य नव्हतें अशा सुधारलेल्या देशांत त्यांनीं व्यापाराच्या मिषानें चंचुप्रवेश करून नंतर क्रमाक्रमानें त्या देशांचे लचके तोडण्यास आरंभ केला. असो.

हिंदुस्थानचा फार प्राचीन काळापासून युरोप खंडांतील सुधारलेल्या देशांशीं व्यापार असे. ह्यावेळी हिंदुस्थानांतून तिकडे माल पाठविण्याचे दोन मार्ग असत. खैबरच्या घाटांतून अफगाणिस्तान, इराण, तुर्कस्तान या देशांतून खुष्कीच्या मार्गानें उंटांवरून माल जात असे; व कल्याण व सुरत ह्या बंदरांतून तांबड्या समुद्रांत नावांतून, नंतर कैरोपर्यंत खुष्कीनें व भूमध्यसमुद्रांतून पुन्हां नावांमधून जलमार्गानें पुष्कळ माल अरबलोक नेत असत. अशा तऱ्हेनें आलेला माल युरोपांतील लोकांस फारच महाग पडे. हा माल आपण आपल्या जहाजांतून आणल्यास बराच स्वस्त पडेल असें वाटून अरबी लोकांच्या हातांतील व्यापार हिसकून घेण्याचा प्रयत्न युरोपांतील राष्ट्रांनीं केला. या प्रयत्नास यश येऊन कालांतरानें या देशाची कशी दुर्दशा झाली हें वाचकांस सांगण्याची जरूरी नाहीं.

पाश्चिमात्य राष्ट्रांनीं हिंदुस्थानांत घटोत्कचाप्रमाणें मायावी बाजार बसवून लोकांच्या सोन्यारुप्याबद्दल नकली जिनसा त्यांस देण्याचा ज्याप्रमाणें क्रम सुरू केला त्याचप्रमाणें चीन व जपान ह्या देशांशींदेखील वरील प्रमाणें देवघेव करण्याचा यत्न चालविला. मेंडेस पिंटो ह्यानें व्यापार करण्याची परवानगी मागण्याकरितां इ. स. १५४७ त कशी सफर केली, त्यानें तीन जपानी मनुष्यें पळून जात असतांना आपले जहाजावर घेऊन झेवियर बावाच्या स्वाधीन कशीं केलीं, त्यानें त्यांस गोव्यास नेऊन

खिती केल्यावर पुन्हा जपानांत येऊन ख्रिस्तीधर्माचें बीजारोपण कसें केलें व त्याचा उत्कर्ष होऊन शेवटीं त्याचें निर्मूलन कसें झालें ह्याविषयीं सविस्तर हकीकत मागील प्रकरणांत सांगितलीच आहे. आतां ह्या प्रकरणांत युरोपियन राष्ट्रांनीं जपान देश व्यापाराकरितां कसा खुला करून घेतला व हातांतील तागडी फेंकून देऊन बंदुक हातीं घेण्यापूर्वींच जपानी लोक कसे सावध झाले ह्याविषयीं सविस्तर हकीकत द्यावयाची आहे.

पिंटोस व्यापार करण्याच्या सवलती मिळाल्यापासून जपानमध्यें व्यापारसंबंधी वर्चस्व पोर्तुगीज लोकांचेंच होतें. पुढें पोर्तुगल व स्पेन ही दोन्ही राष्ट्रें दुसरा फिलिप याचे अमलाखालीं एकत्र झाल्यामुळें, या नवीन प्रचंड राष्ट्राशीं स्पर्धा करण्यास कोणतेंही राष्ट्र धजावलें नाहीं. यामुळें अटलांटिक व पासिफिक महासागरांत याचें वर्चस्व फारच असे. परंतु ही स्थिति फार दिवस राहिली नाहीं. इ. स. १५९९ चे सुमारास डच लोकांनीं ' इंडिश कंपनी ' नांवाची व्यापारी मंडळी स्थापन करून ईस्ट इंडीजशीं व्यापार करण्याकरितां पांच जहाजें पाठविलीं. हीं जहाजें नेहमींप्रमाणें आफ्रिकेस वळसा घालून न जातां दक्षिण अमेरिकेस वळसा घालून पासिफिक महासागरांत गेलीं. या पांचापैकीं दोन दक्षिण अमेरिका खंडाच्या दक्षिण टोंकापासून परत फिरलीं. तिसरें जहाज स्पॅनिश लोकांनीं धरिलें व बाकीचीं दोन पासिफिक महासागरांत येऊन पोहोंचलीं. त्यांपैकीं एक पुढें बेपत्ता झालें व एक मात्र क्यूशु बेटाच्या आग्नेयेस बंगो प्रांताच्या किनाऱ्यास लागलें. या जहाजांतील बहुतेक सर्व लोक उपासमारानें व रोगानें मरण पावले होते; आठ लोक मात्र जिवंत होते व त्यांपैकीं चार सुस्थितींत होते. ह्या चारांमध्यें वुइल्यम अॅडम्स नांवाचा इंग्रजी सुकाणु चालविणारा मनुष्य होता. परराष्ट्रांकडून व्यापाराकरितां मोकळीक मागण्यास आलेल्या अधिकाऱ्यास प्रथम शोगनकडे नेण्याचा हुकूम असल्यामुळें अॅडम्स व एक डच मनुष्य यांस ओसाका येथें ईयासूकडे

पाठविण्यांत आलें. त्यानें विचारल्यावरून अडॅम्स यानें स्पेन व हालंड या देशांचा परस्पराशीं कसा काय संबंध होता हें सांगितलें व डच लोक केवळ व्यापाराकरितां जपानांत आले आहेत असें त्यास कळविलें. सर्व हकीकत ऐकून घेऊन ईयासूनें त्यास सुमारें ४० दिवस अटकेंत ठेविलें. ह्या अवधींत पोर्चुगीज जेसुईट लोकांनीं व व्यापाऱ्यांनीं डच लोक हें चांचे लोक आहेत असा ईयासूचा समज करून देणाचा व त्या देशांत आलेल्या डच लोकांस ठार मारवून त्यांस दहशत बसवून पुन्हा त्यास जपानांत येऊं न देण्याचा प्रयत्न चालविला. परंतु ईयासूनें त्याचें न ऐकतां त्यानें अडॅम्स यास सोडून देऊन आपल्या जहाजावर जाण्याची परवानगी दिली. डच जहाजावरील सर्व माल जपानी लोकांनीं लुटून नेल्याकारणानें ईयासूनें डच लोकांस नुकसानीदाखल पन्नास हजार रुपये दिले. ही मोठी रक्कम पाहून डच जहाजावरील लोकांत भांडणें सुरू झालीं. हें पाहून कप्तानानें ती सर्व रक्कम सर्व खलाश्यांमध्यें सारखी वाटून दिली व ज्यास जिकडे वाट सांपडेल तिकडे त्यानें जावें असें त्यांस सांगितलें; व आपण स्वतः एका चिनी जहाजांत बसून पाटणकडे निघून गेला. या प्रमाणें डच लोकांच्या व्यापारी मोहिमेची विल्हेवाट लागली.

अडॅम्स हा आपल्या वांट्याचे पैसे घेऊन जपानांतच राहिला. जपानाकरितां त्यानें कांहीं लहानमोठीं जहाजें बांधली एवढेंच नव्हे, तर परराष्ट्रांसंबंधीं माहितीही तो ईयासूस प्रसंगोपात देत असे. यामुळें अडॅम्सवर त्याची फार मर्जी बसली; व तो संतुष्ट रहावा ह्मणून त्यास यद्दोजवळ कांहीं जमीनही दिली. अडॅम्स इंग्लडांत जन्मलेल्या होता व त्याची बायको व मुलें तेथेंच रहात होती. त्यांस भेटण्यास जाण्याचा त्यानें पुष्कळवेळां प्रयत्न केला पण व्यर्थ. शेवटीं एका जपानी स्त्रीशीं विवाह लाविला. याप्रमाणें सुमारें वीस वर्षें जपानांत राहून तो इ. स. १६२० त मरण पावला. त्याचें जपानी दरबारांत चांगलेंच वजन

असल्यामुळें, डच व इंग्लिश लोकांच्या व्यापाराकरितां विशेष सवलती मिळविण्याविषयीं त्यानें बरीच खटपट केली व त्यास यशही मिळालें. ह्या दृष्टीनें पाहिलें असतां त्याचें चरित्र बरेंच मनोरंजक आहे व ह्मणूनच तें येथें किंचित् विस्तारानें दिलें आहे. असो.

डच लोकांची दुसरी ( पण पहिल्या खेपेची वर सांगिल्याप्रमाणें वाताहत झाल्या कारणानें हिलाच पहिली असें ह्मणण्यास हरकत नाहीं ) खेप इ. स. १६०९ त जपानांत आली. रीतीप्रमाणें शोगनची व डच अधिकाऱ्याची भेट झाल्यानंतर ईयासूनें त्यास व्यापाराची मोकळीक दिली व हालंडच्या राजानें पाठविलेल्या पत्रास उत्तर पाठवून डच व्यापारी जपानांत आल्यास त्यांचें संरक्षण जपानी सरकार करील असें त्यास अश्वासन देण्यांत आलें. या कराराप्रमाणें १६११ मध्यें डच लोकांनीं बरींच जहाजें मालानें भरून जपानांत पाठविलीं. डच कप्तानानें अडॅम्सच्या मदतीनें ईयासूची गांठ घेतल्यानंतर शोगननें सर्व देशभर असा हुकूम सोडिला कीं, बादशहानें डच लोकांस जपानाशीं व्यापार करण्याची परवानगी दिलेली आहे. त्यांस कोणत्याही प्रकारचा त्रास न देतां जरूर पडल्यास त्यांस मदत करावी. या वेळेपासून डच लोकांचा हिंदीमहासागरांतील बेटांत व जपानांत सुरळीत व्यापार चालू झाला.

अडॅम्स नांवाचा इंग्लिश मनुष्य जपानामध्यें असून त्याचें दरबारांतही चांगलें वजन आहे हें वर्तमान डच लोकांकडून इंग्लिशांस कळतांच, जपान देशाशीं व्यापार करण्याची त्यांची इच्छा अनावर झाली. त्यांनीं लागलीच ' लंडन ईस्ट इंडिया कंपनी ' नांवाची एक संस्था स्थापन करून कप्तान जॉन् सॅरिस् यास पहिल्या जेम्सनें जपानच्या बदशहास लिहिलेलें पत्र देऊन इ. स. १६११ मध्यें जपानाकडे रवानगी करण्यांत आली. ही वकील मंडळी इ. स. १६१३ मध्यें जपानांत येऊन पोहोंचल्याबरोबर अडॅम्सच्या साहाय्यानें त्यांस तावडतोब व्यापार करण्याची परपरवानगी मिळाली. या गोष्टीमुळें डच व्यापारी लोकांचें नुकसान होण्याचा बराच संभव असल्यामुळें ती त्यांस रुचली नाहीं. शेवटीं डच व्यापाऱ्यांच्या

मनांत मत्सर उत्पन्न होऊन इंग्रजांचें नुकसान व्हावें ह्मणून त्यांनीं इंग्लिश मालापेक्षां आपला माल फार स्वस्त विकण्याचा धडाका चालविला परंतु शेवटीं कांहीं तोडजोड झाल्यानंतर सॅरिस स्वदेशीं निघून गेला. पुढें १६१७ त इंग्रजांनीं पांच जहाजें जपानाकडे पाठविलीं. परंतु हालंड व इंग्लंड यांच्यामध्यें यूरोपांत युद्ध सुरू असल्यामुळें त्यांचें पूर्वेकडेही युद्ध चालू झालें. त्याकालीं व्यापारी जहाजें प्रसंग पडल्यास लढाईकरितां यावीं अशा तयारीनें पाठवीत असत. परंतु पूर्वेकडे डच जहाजांची संख्या जास्त असल्यामुळें इंग्रजांस हार खाणें भाग पडलें. पुढें जावा बेटांत अंबायना येथें दहा इंग्रजांची डच लोकांनीं कत्तल केल्यामुळें व इंग्रजांची हिंदुस्थानांतच चांगली डाळ शिजल्यामुळें त्यांनीं जपानशीं व्यापार करण्याच्या कामांत इंग्रजांचे चाळीस हजार रुपये खर्च झाले; पण त्यांचा प्रयत्न ह्यावेळीं सिद्धीस गेला नाहीं.

इंग्रज लोक निघून गेल्यावर डच व पोर्चुगीज यांच्यामध्यें व्यापाराची चढाओढ चालली व शेवटीं १६४० चे सुमारास पोर्चुगीज लोकांसही गाशा गुंडाळून जाणें भाग पडलें. याप्रमाणें इतर युरोपांतील राष्ट्रांवर डच लोकांची सरशी होऊन, त्यांचा व्यापार कमीजास्त प्रमाणावर सुमारें दोन शतकेंपर्यंत चालला होता. १९ व्या शतकाच्या आरंभीं रशिया, इंग्लंड व अमेरिका ह्या राष्ट्रांनीं व्यापारासाठीं कांहीं बंदरें मोकळीं ठेवण्याकरितां जपान सरकारापाशीं बोलणें चालविलें होतें; पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाही. परकीय राष्ट्रांशीं व्यापारी तह करावयाचा नाहीं हा जपानचा हेका १९ व्या शतकाच्या मध्यापर्यंत चालला. परंतु हा दुराग्रह यापुढें चालूं द्यावयाचा नाहीं असा अमेरिकेनें ठराव केला व हें काम सामोपचारानें न झाल्यास जबरदस्तीनें जपान सर्व युरोपियन राष्ट्रांस व्यापाराकरितां खुलें करण्याचा त्या देशानें निश्चय केला. ही बातमी डच लोकांनीं जपानी लोकांस कळविली; परंतु जपानास स्वपराक्रमाची अतिशय घमेंड असल्यामुळें त्या सूचनेकडे त्यांनीं अगदीं दुर्लक्ष केलें. शेवटीं अमेरिकेनें आपला हेतु

तडीस नेण्याकरितां पेरी नांवाच्या अधिकाऱ्याचे अमलाखालीं चार लढाऊ जहाजें देऊन व इतर सर्व व्यवस्था करून त्यास जपानाकडे रवाना केलें.

अमेरिकेस एवढी उठाठेव कशाला करावयास पाहिजे होती असा प्रश्न येथें उपस्थित होतो. परंतु त्या वेळच्या त्यांच्या समजाप्रमाणें व व्यापारी तत्वाप्रमाणें असें केल्यावांचून त्यास गति नव्हती. अमेरिकेनें इतक्या आग्रहानें व नेटानें हा प्रयत्न करण्याचें कारण त्यावेळीं अमेरिकेच्या पश्चिम किनाऱ्यावरील मासे धरण्याच्या कारखान्यास फार महत्व प्राप्त झालें होतें. त्याचप्रमाणें कालिफोर्निया प्रांतांत सोन्याच्या खाणी सांपडल्यामुळें तो प्रांत ह्मणजे व्यापाराचें केंद्रच होऊन बसला होता. तसेंच इंग्लंड व चीन ह्या देशांमध्यें 'अफूच्या लढायां' मुळें ( हिंदुस्थानांतील अफू चीन देशांत खपविण्यासाठीं इंग्रजांनीं केलेल्या लढाया ) चीन देश परकीयांस खुला झाला होता. ह्या देशाशीं व्यापार करण्याकरितां अंतर फार असल्यामुळें जहाजासाठीं कोळसे सांठविण्यासाठीं कांहीं ठाणीं पाहिजे होतीं तीं ठाणीं व्यापारासंबंधीं कांहीं किरकोळ सवलती मिळविण्याकरितां अमेरिकेस हा मार्ग स्वीकारणें भाग पडलें असें युरोपियन लोक या गोष्टीचें समर्थन करितात. असो.

पेरी १८५२ मध्यें अमेरिकेहून निघून दक्षिण आफ्रिकेस वळसा घालून १८५४ मध्यें जपानांत यद्दो शहराजवळ येऊन थांबला. त्याच्याबरोबर असलेले ते प्रचंड समुद्रावरील तरते लांकडी किल्ले आणि त्यांतील युद्ध सामग्री इत्यादि अपूर्व देखावा पाहून जपानी लोक व अधिकारी अगदीं भांबावून गेले व 'तुह्मी नागासाकी येथें गेल्यावर तुमच्याशीं तहाचें बोलणें सुरू करूं' असा शोगननें त्यास निरोप पाठविला. परंतु पेरी कांहीं केल्या ऐकेना. शेवटीं नाइलाज झाल्यावर योग्य अधिकाऱ्यामार्फत पेरी व शोगन यांची भेट झाली. पेरीनें प्रेसिडेंटचें बादशहास लिहिलेलें पत्र वाचून दाखविल्यावर 'मी परत येईतोंपर्यंत या गोष्टीचा नीट विचार करा' असें निक्षून सांगितलें; व योग्य विचार न झाल्यास

जपानशीं व्यापार करण्याचे हक्क अमेरिकेस व इतर राष्ट्रांस जबरीनें द्यावे लागतील असें आपल्या भाषणामध्यें ध्वनित करून तो चीनकडे निघून गेला.

जपान व अमेरिका हीं दोन्ही राष्ट्रें जवळ जवळ असल्या कारणानें परस्परांचा स्नेहभाव असणें व एकमेकांस त्या त्या देशांत व्यापाराचे हक्क असणें हें उभयतांस हितावह आहे असा पेरीनें मित्रत्वाच्या नात्यानें केलेला उपदेश व त्याच्याच बरोबर अमेरिकेच्या सामर्थ्याच्या जोरावर जपानास दिलेली धमकी ह्या दोन्ही गोष्टीमुळें जपानी अधिकारी पेचांत सांपडल्यासारखे झाले. अमेरिकेस व्यापार करण्याची परवानगी द्यावी तर सुभेदार व प्रजा नाखुष होऊन राज्यांत बखेडे माजतील; बरें, न द्यावी तर पाश्चात्य युद्धकौशल्य व नवीन शस्त्रास्त्रें यांच्यापुढें आपला निभाव लागणें कठीण आहे असें त्यांस वाटूं लागलें. अशा स्थितींत सर्व प्रांताधिकाऱ्यांचीं मतें घेण्याचें ठरवून व अमेरिकेच्या प्रेसिडेंटनें बादशहास पाठविलेल्या पत्राची नक्कल प्रत्येकाकडे पाठवून त्यांचीं उत्तरें आल्यावर मग पेरीस काय तें कळवावयाचें असा जपानी सरकारानें निश्चय केला. राजप्रतिनिधींचीं जीं उत्तरें आलीं त्यांच्यापैकीं मासल्या करितां एक येथें दिलेलें आहे. तें असें:—

"आपल्या या पवित्र देशांत आजपर्यंत कोणत्याही परराष्ट्राचें सैन्य उतरलें नाहीं; मग अमेरिकेचें सन्यै तरी आपण कां म्हणून उतरूं द्यावें. ख्रिस्ती धर्माचा प्रसार न व्हावा म्हणून आपण वाटतील तसे कडक उपाय योजले तरी अद्यूनपर्यंत त्या धर्माचें निर्मूलन झालेलें नाहीं; मग अमेरिकेस चंचुप्रवेश करूं दिला तर ख्रिस्ती धर्मास फार जोर येईल. अमेरिकेस आपल्या देशांत व्यापारासाठीं येऊन देऊन आपणास फायदा तरी काय? आपलें सोनेंरुपें परराष्ट्रांत पाठवून त्यांच्या बद्दल कांच, लोंकर इत्यादि शेकडो मातीमोलाचे नकली पदार्थच घ्यावयाचे कीं नाहीं? अशा रीतीनें आपला फायदा तो कसा होईल? वास्तविक पाहतां डच लोकांस पूर्वी जी परवानगी दिलेली आहे, तीच रद्द करावयास पाहिजे आहे. राशियास देखील व्यापार करण्याची परवानगी आपण दिलेली नाहीं;

मग अमेरिकेसच ती कांय ह्मणून द्यावयाची? बरें, एकदां अमेरिकेस ती दिल्यावर इतर राष्ट्रांस ती न देण्याबद्दल कोणाती सबब पुढें आणावयाची? युरोपियन राष्ट्रें प्रथम व्यापाराकरितां ह्मणून येतात, मग हळूच धर्मप्रसार करावयास लागतात; नंतर प्रजेमध्यें कलह लावून राज्य बळकाविण्यास प्रारंभ करितात असा अनुभव हिंदुस्थान व चीन ह्या देशांतील लोकांस पूर्णपणें आलेला आहे. त्यांना ठेंच लागलेली पाहून आपण शहाणे व्हावयास नको काय? आपणही युरोपियन लोकांप्रमाणें परराष्ट्रांत जाऊन व्यापार करावा तर आपल्या अंगीं तितकी धमक कोठें आहे? आज सुमारें दोनशें वर्षांच्या शांततेमुळें लोक युद्धकला विसरून गेल्यासारखे झाले आहेत. तथापि आपल्या या पुण्यवान् देशांत येऊं पाहणाऱ्या रानटी लोकांच्या उर्मटपणामुळें प्रत्येक मनुष्याच्या अंगांत शौर्याचा संचार झालेला आहे; अशावेळीं त्यांच्या वीरश्रीचा उपयोग जर करून न घेतला तर आपलेविषयीं परकीयांच्या मनांत जी थोडीबहुत आदरबुद्धि वास करीत आहे ती समूळ नाहींशी होईल इतकेंच नव्हे, तर तीं राष्ट्रें केव्हांना केव्हां तरी जपानास रसातळास पोंहोंचविल्यावांचून राहणार नाहींत."

अशा तऱ्हेचेच बहुतेक सर्व प्रतिनिधींचे अभिप्राय आले. कांहीं थोड्यांनीं तीन अथवा पांच वर्षेंपर्यंत अनुभव घेऊन पहावें असें मत दिलें. तथापि बहुमताप्रमाणें अमेरिकेतील लोकांस येऊं द्यावयाचें नाहीं असें ठरलें; व प्रसंग पडल्यास शत्रूशीं दोन हात करितां यावे ह्मणून सज्जता करण्यास सुरवात झाली. किल्ल्यांची दुरुस्ती करण्यास आरंभ झाला. देवळांतील घंटा मोडून त्यांच्या तोफा ओतण्यांत आल्या. सैन्यास बंदुका देऊन कवायत शिकविण्याचें काम जारीनें चाललें व स्वदेशरक्षणार्थ आपण कांहीं तरी मदत करावी ह्मणून लढवय्ये लोकांच्या झुंडीच्याझुंडी राजधानीकडे धांव टोकूं लागल्या. अशा प्रकारें युद्धाची कडेकोट तयारी चालली असतां पेरी हा जपानांतून निघाल्यापासून आठ महिन्यांनीं दहा लढाऊ जहाजांसह यद्दोच्या आखातांत येऊन थडकला. ह्या प्रचंड आरमाराचा अदृष्टपूर्व देखावा

पाहून जपानी मुत्सद्यांस अमेरिकेच्या सामर्थ्याची कांहींशी कल्पना आली, व लढाई करून पराभूत राष्ट्र ह्मणून तह करण्यापेक्षां, खुषीनें तह करणें बरें असें वाटून त्यांनीं अमेरिकेशीं तह करण्याचें ठरविलें आहे असें पेरीस सांगितलें. नंतर तह कोठें करावयाचा याविषयीं भवति न भवति होऊन शेवटीं याकोहामा येथें तह करण्याचें ठरलें. योग्य दर्ज्याचे जपानी अधिकारी तेथें आल्यावर आणि तहनाम्याच्या कलमांविषयीं वादविवाद होऊन सूचना व उपसूचनांचा पूर्ण विचार झाल्यावर, मेजवान्या व नजरनजराणे देणें घेणें झालें व तहनाम्यावर सह्या करावयाचें ठरलें. या ठरावाप्रमाणें १८९४ च्या मार्च महिन्यांत जपाननें अमेरिकेशीं तह केला. हा जपानचा युरोपियन राष्ट्रांशीं पहिलाच तह होय. याचवर्षीं इंग्लंडशीं, १८९९ मध्यें रशियाशीं व १८९६ त हालंडशीं वेगवेगळे तह झाले. सर्व राष्ट्रांकरितां एकंदर तीन बंदरें खुलीं करण्यांत आलीं व प्रत्येक राष्ट्रानें कोणच्याही दोन बंदरांशीं व्यापार करावा असें ठरविण्यांत आलें. १८९७ सालीं ह्या करारामध्यें थोडा फेरफार करण्यांत आला. व नंतर १८९८ त तहाच्या ज्या अटी ठरल्या त्यांच्या अन्वयेंच परकीय व्यापारी जपानाशीं व्यापार करीत आहेत. ह्या तहांतील कलमांपैकीं दोन जपानास फारच त्रासदायक झालीं होतीं. एका कलमा अन्वयें जपानास परकीयांचे मालावर शेकडा पांचापेक्षां जास्त जकात बसवितां येत नव्हती. हा कर फारच थोडा होता व त्याच्यायोगानें वसूल होणारी रक्कम त्या खात्याच्या अधिकाऱ्यांचा पगार भागविण्यास देखील पुरेशी नव्हती. दुसरें एक असें कलम होतें कीं, जपानांत जे जे परकीय लोक येतात ते जपानी कायद्याच्या योगानें बांधले जात नसून ते त्या त्या देशांतील वकीलास मात्र जबाबदार असावे. ह्यामुळें मोठा अपराध घडूनही दोषमुक्त होणें अथवा अत्यल्प दंड होणें एवढेंच शासन परदेशी अपराध्यांस मिळे. ह्या दोन्ही कलमांच्या योगानें होणाऱ्या गैरसोईकडे जपाननें युरोपियन राष्ट्रांचें लक्ष अनेकवेळां ओढिलें होतें; परंतु त्याचा फारसा उपयोग झाला नाहीं. ठीकच आहे! जपानचे मनगटांत आपलें ह्मणणें परकीयास कबूल करा-

वयांस लावण्यास पुरेसा जोर कोठें होता? परंतु इ. स. १९०० पासून ही स्थिति अगदीं बदलली; व आतां तर जपानच्या मनाप्रमाणें सर्व गोष्टी घडून येण्यास फारसा उशीर लागणार नाहीं. इतर राष्ट्रेंही त्याच्याविरुद्ध जाण्यास धजावणार नाहींत. असो.

१८५८ सालच्या तहामुळें परकीय राष्ट्रांशीं जपानचा जो संबंध जडला, त्यामुळें त्या देशावर कांहीं बिकट प्रसंग कसे ओढवले व त्यांच्या-योगानें गाढ निद्रेंतून तें जागें कसें झालें ह्याविषयींचा कथाभाग थोडासा मनोवेधक असल्यामुळें तो येथेंच सांगितल्यास बरें. वरील तह झाल्यानंतर जपानांतील लोकांमध्यें दोन तट उत्पन्न झाले—एक कैकोकु व दुसरा जोई. कैकोकु पक्ष तहास व सुधारणेस अनुकूल होता; आणि जोई पक्ष तहास प्रतिकूल व पूर्वस्थितींत समाधान मानणारा होता. याच पक्षास असंतुष्ट, धाडसी व शूर असे रोनिन लोक येऊन मिळाले. त्यांनीं खून वगैरे अनेक अनन्वित कृत्यें करण्यास व तह करणाऱ्या सरकारास त्रास देण्यास आरंभ केला. हें तह करणारें सरकार ह्मणजे शोगन व त्याचें मंत्रिमंडळ होय. त्यास 'बाकुफू' अथवा 'क्षात्रराज्य' असें ह्मणत. ह्या सरकारच्या प्रधानास रोनिन लोकांनीं १८६० सालीं ठार मारिलें. १८६१ मध्यें अमेरिकेच्या वकीलाच्या चिटनीसास तो परदेशी व्यापार वाढविण्याविषयीं फार परिश्रम करीत होता ह्मणून ठार मारण्यांत आलें. ह्या त्यांच्या कृत्याबद्दल जपान सरकारास दहा हजार डालर भूर्दंड भरावा लागला. ह्यानंतर कांहीं महिन्यांनीं इंग्रजी वकीलायतीवर हल्ला होऊन दोन संत्री ठार झाले व वकीलास व त्याच्या चिटनीसास दुखापत झाली. १८६२ मध्यें पुन्हा एकदां त्याच वकीलायतीवर हल्ला झाला व दोन इंग्रजी पहारेकरी ठार झाले. या कृत्याबद्दल जपान सरकाराकडून त्यांच्या कुटुंबाच्या पोषणाकरितां दहा हजार पौंड घेण्यांत आले. ह्याच वर्षीं सत्सुमाचा सुभेदार आपल्या लवाजम्यासह यद्दोहून परत जात असतां कांहीं इंग्रज लोक घोड्यावर बसून समोरून येत होते. सुभेदाराच्या स्वारी जवळ आल्यावर रीतीप्रमाणें खालीं उतरून मुजरा न करितां ते तसेच पुढें धाउले. हें स्वारींतिल शिपायांस सहन न होऊन त्यांनीं

तीन इंग्रजांस तरवारीचे वार केले. ह्यांच्यापैकीं एक इसम मरण पावला. ह्या कृत्याचा सूड घेण्याचें इंग्रजी वकील कर्नल नील ह्याचे मनांत होतें. परंतु इतर सर्व युरोपियन राष्ट्रांनीं त्या इंग्रजी मनुष्यांसच अपराधी ठरविल्यामुळें जपानशीं लढाईचा प्रसंग टळला. परंतु एक लाख पौंड शोगननें व मोठी थोरली रक्कम सत्सुमाच्या सुभेदारानें नुकसानीदाखल द्यावी असें ठरलें. परंतु ठरावाप्रमाणें रक्कम न मिळाल्यामुळें, दर्यासेनापती कुपर यास सत्सुम प्रांताकडे सात लढाऊ जहाजांनिशीं पाठविण्यांत आलें. तो कोगोशिमा येथें आला व जपानचीं तीन नवीं जहाजें जळल्यानंतर त्या शहरावर तोफांचा भडिमार करून तें जाळून टाकिलें. याप्रमाणें भयंकर हानि झाल्यावर तो सुभेदार शुद्धीवर आला व त्यानें लागलींच ठरावाप्रमाणें रक्कम देऊन टाकिली. इतकें झालें तरी जोई पक्षाच्या लोकांचें सूड घेण्याचें काम चालू होतेंच. ह्या त्यांच्या कृत्यांच्या योगानें सरकारास फार त्रास होऊं लागला व दंडादाखल परकीयांस लाखों रुपये देणें भाग पडलें. परकीयांविषयीं द्वेष दिवसानुदिवस अधिकच वाढत चालला व त्यास कायमचें हाकून देण्याची चळवळ सुरू झाली. या असंतुष्ट लोकांनीं चोसुच्या सुभेदारास आपला पुढारी केलें व परकीयांस व्यापाराची परवानगी देणारा शोगन व व्यापाकरितां आलेले परकीय लोक यांचेविरुद्ध उघड बंडावा चालविला. चोसूच्या सुभेदारानें आपल्या प्रांतातील शिमोनोसेकी नांवाच्या सामुद्रधुनीमध्यें जपानी लढाऊ जहाजें ठेविलीं व किनाऱ्यावर तोफा चढवून आपल्या कार्यास प्रारंभ केला. प्रथम १८६३ च्या जून महिन्यांत एका अमेरिकन व्यापारी जहाजावर हल्ला करण्यांत आला. पण तें कोणतेंही नुकसान न होतां निसटून गेलें. ह्याबद्दल अमेरिकेच्या वकीलानें १२,००० डालर नुकसानीदाखल भरून घेतलें. थोड्या दिवसानंतर त्यांनीं एका फ्रेंच लढाऊ जहाजावर हल्ला केला व पुढें लागलींच एका डच जहाजावरही मारा केला ह्या अपमानाबद्दल सूड उगविण्याच्या हेतूनें वरील तीन्ही राष्ट्रांनीं आपलीं लढाऊ जहाजें शिमोनोसेकी येथें पाठवून तेथील जपानी जहाजांचा व किनाऱ्यावरील तोफांचा पूर्ण विध्वंस केला; व झालेली

हानि भरून देण्याकरितां व पुन्हा अशा प्रकारचे हल्ले होऊं नयेत ह्मणून करार करण्याकरितां कांहीं बोलाचाली सुरू झाली. जपान सरकाराचें असें ह्मणणें पडलें कीं, सुभेदाराच्या स्वैर वर्तनाबद्दल सरकार जबाबदार नाहीं व ह्मणून जपानी सरकारास नुकसान भरून देण्याचें कारण नाहीं; दुसरा करार एक-सारखा लांबणीवर पडत चालला. हें पाहून सर्व परकीय राष्ट्रें चि-डून जाऊन सर्वांनीं मिळून जपानास आपलें ह्मणणें कबूल करण्यास भाग पाडण्याचा निश्चय केला; व ह्याकरितां इंग्रजांनीं नऊ, डच लो-कांनीं चार, फ्रेंचांनीं तीन व अमेरिकेनें एक अशीं एकंदर १७ लढाऊ जहाजें शिमोनोसेकीकडे पाठविलीं. ह्या सर्व जहाजांनीं १८६४ च्या सेप्टेंबर महिन्यांत फार जोराचा भडिमार करून जपानी लोकांचें अतिशय नुकसान केलें. या पाश्चात्त्यांच्या एकवटलेल्या सामर्थ्यापुढें आपला निभाव लागावयाचा नाहीं अशी पूर्ण खात्री होऊन, त्या सुभे-दारानें त्यांचें सर्व ह्मणणें मान्य करण्याचें कबूल केलें. याप्रमाणें या जंगी मोहिमेचा निकाल झाला. यानंतर मोहिमेच्या खर्चाबद्दल व नुकसानीबद्दल ह्मणून जपान सरकाराकडून तीस लाख डालर घेण्यांत आले. ही मोठी थोरली रक्कम प्रत्येक हप्त्यास पांच लाख डालर-प्रमाणें फेडून टाकिली. ह्या रकमेपैकीं अमेरिका, फ्रान्स व हालंड या राष्ट्रांस प्रत्येकीं चौदा हजार डालर, त्याच्यावर प्रत्यक्ष हल्ला झाला ह्मणून, देण्यांत आले; आणि बाकीची रक्कम चौघांत सारखी वाटून घेण्यांत आली. असो. या प्रकरणांत जपानास झालेली शिक्षा फाजील कडक झाली हें कोणीही कबूल करील. ह्या संबंधांत विशेष लक्षांत ठेवण्या-जोगी गोष्ट ही आहे कीं, अमेरिकेचें कोणत्याही प्रकारचें नुकसान झालें नव्हतें, तरी प्रथम बारा हजार व नंतर इतर राष्ट्रांबरोबर जो हिस्सा वांट्यास आला तोही त्या राष्ट्रानें घेतला. याविषयीं अमेरिकेंतील वर्तमानपत्रांत बरीच चर्चा व कडक टीका झाल्यामुळें त्या देशानें आपल्या हल्लीच्या न्यायीपणास अनुसरून १८८३ सालीं जपानपासून घेतलेली सर्व रक्कम परत केली, हें त्यास अत्यंत

भूषणावह आहे. परंतु इंग्लंडकडे पहा! ह्या राष्ट्राचा कोणत्याही तऱ्हेचा अपमान अगर नुकसान न होतांही जपानास शासन करण्याचे कामांत त्यानें अव्वल दर्जाची कामगिरी बजाविली; व आपली उत्कट स्वार्थपरायणता दाखवून धनलाभ करून घेण्याची संधि फुकट जाऊं दिली नाहीं! एकाच जातीच्या दोन राष्ट्रांमध्यें न्यायाच्या बाबतींत असा फरक कशानें पडला?

कोगोशिमा व शिमोनोसेयी ह्या दोन्ही ठिकाणीं जपानी लोकांस जो अनुभव आला तो फारच महत्वाचा होता. ह्या प्रसंगांच्या योगानें त्यांचे डोळे उघडले व त्यांस आपल्या स्थितीचें यथार्थ ज्ञान झालें. जुनीं शस्त्रें व प्राचीन युद्धकला यांचा नवीन शीघ्रविनाशक व संहारक अस्त्रें व अर्वाचीन युद्ध-कौशल्य यांच्यापुढें टिकाव लागणें कठीण आहे; व आपणास जर परकीयांशीं लढाईत बरोबरी करावयाची असेल, तर त्यांच्या सारखें लष्करी शिक्षण व समरकौशल्य हीं आपल्यास संपादन केली पाहिजेत एवढेंच नव्हे, तर मोठमोठीं लढाऊ गलबतें व आधुनिक शस्त्रास्त्रें हींदेखील आपणा-जवळ असलीं पाहिजेत अशी त्यांची खात्री झाली. इ. स. १८६२ मध्यें जपानांतून एक वकीलमंडळ युरोपांतील राष्ट्रांची परिस्थिति व सामर्थ्य कसें काय आहे, हें पाहण्याकरितां पाठविण्यांत आलें होतें. त्यांनीं परत आल्यावर युरोपांतील सुधारलेल्या राष्ट्रांची फार तारीफ केली व जपानांतून त्या लोकांस हांकून लावणें फार धोक्याचें व मूर्खपणाचें आहे असें त्यांनीं आपलें मत दिलें. यावरून परकीयांस घालवून देण्याचें भरीस न पडतां, ते जपानांत नेहमीं राहणार असें गृहीत धरून त्यांच्यापासून आपला होईल तितका फायदा करून घ्यावयाचें जपान सरकारानें ठरविलें. यानंतर लवकरच जपाननें तरुण बुद्धिमान् व होतकरू अशा विद्यार्थिवृंदास परराष्ट्रांमध्यें युद्धकला व आधुनिक शास्त्रें शिकण्याकरितां पाठविलें; व हा क्रम अद्यापिही चालू आहेच. हल्लीं राज्य करीत असलेला जपानचा बादशाहा मुत्सु-हितो हा १८६८ मध्यें गादीवर बसल्यापासून जपानची विलक्षण प्रगति होऊं लागली. ह्या वेळेपासून सैन्याची रचना युरोपांतील पद्धतीप्रमाणें करण्यांत आली. प्रत्येक वयांत आलेल्या व सुदृढ मनु-

घ्यानें तीन वर्षेपर्यंत सैन्यांत चाकरी केली पाहिजे, असा नियम करण्यांत आला. फ्रेंच व जर्मन सेनापती लष्करी शिक्षण देण्यासाठीं सल्लागार ह्मणून नेमण्यांत आले. अशा रीतीनें जपानी सैन्य आधुनिक युद्ध-शास्त्रांत तयार करण्यांत आलें.

जपानी आरमार फारच कमी दर्ज्याचें होतें. त्याची सुधाराणा करण्या-करितां इंग्रजी अधिकारी जपान सरकारनें मागवून घेतले. नंतर १८७३ त जपानमध्येंच दर्यायुद्धाची कला जपानांतील लोकांस अवगत व्हावी ह्मणून एक शाळा स्थापन करण्यांत आली व त्या शाळेंत ३० इंग्रजी शिक्षक नेमण्यांत आले. यांनीं जपानी लोकांस सहा वर्षें शिक्षण दिल्यावर, जपानी लोकांस ती कला चांगली अवगत झाली. नंतर त्यांस परत पाठविण्यांत आलें. तरी हल्लीं एक दोन इंग्रजी शिक्षक त्या शाळेंत शिक्षण देण्याकरितां ठेविलेले आहेत. हल्लीं जपानी आरमार बरेंच मोठें व प्रबल असून पासिफिक महासागारांत त्याचा चांगलाच वचक आहे.

व्यापाराची मोकळीक मिळाल्याबरोबर, त्या त्या देशांतील राज्यकार-भारांतही हळूच बोट शिरकवण्याची युरोपियन राष्ट्रांस संवय पडलेली होती, व असाच प्रकार जपानमध्येंही झाला असता. परंतु परकीयांनीं व्यापार करण्याची परवानगी मिळविल्याबरोबर जपाननें आपलें सामर्थ्य वाढविण्याची त्वरा केली व ह्मणूनच पारतंत्र्य--विष--पान करून हिंदु-स्थानाप्रमाणें झिजून झिजून मरण्याची जपानवर आलेली पाळी चुकली.असो.

सुधारलेलें सैन्य व आरमार यांच्या कर्तृत्वाची परीक्षा पाहण्याची वेळ जपानावर प्रथम १८९६ सालीं आली. ह्यावर्षीं चीन देशांशीं दर्यायुद्ध करून जपाननें पूर्ण विजय मिळविला. चीन देश मागसलेला ह्मणून त्याचा पराभव झाला असेल असें त्यावेळी यूरोपियन लोकांस वाटत होतें. परंतु हल्लीं रशियाशीं युद्ध सुरू करून जें यश जपाननें संपादन केलें आहे त्यामुळें सर्व जग आश्चर्यचकित झालेलें आहे. प्रथम शिष्यवृत्ति धारण करून अगदीं थोड्या अवकाशांत आपल्या गुरूंचाही पराभव कर-ण्याजोगें प्रावीण्य जपाननें मिळविलें ही गोष्ट त्या राष्ट्रास फार भूषणावह आहे.

---